**श्रीमद्भागवत** (Shreemadbhagavat)

खंड दुसरा

अनुवादक : **अविनाश महादेव नगरकर**

nagarkaram@yahoo.com

12 kilbaaha Close,

Dannimora

Auckland 2013, Australia

फोन नंबर. 00649 2715555

प्रकाशक : **ई साहित्य प्रतिष्ठान**

www.esahity.com

esahity@gmail.com

प्रकाशन : ९ जुलै २०१४ (आषाढी एकादशी)



निर्मिती सहाय्य : अलका पाटिल

## ||श्रीगुरु:शरणं||

संपूर्ण जगदेव नंदनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमा: गाङ्गंवारि

समस्तवारिनिवहा: पुण्या समस्ता:क्रिया: |

वाच: संस्कृतप्राकृत: श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी

सर्वावास्थितिरस्य वस्तूविषया दृष्टे परब्रह्मणि ||



हे परब्रह्मरुपी सद्गुरो, आपल्यासाठी संपूर्ण विश्व म्हणजे एक नंदनवनच आहे. सर्व वृक्ष आपणास कल्पवृक्षच आहेत. सर्व जलाशय गंगा आहेत व आपल्या सर्व क्रिया अत्यंत पवित्र आहेत. आपली वाणी संस्कृत असो कीं प्राकृत ती मला वेदासम शिरोधार्य आहे. सर्व भूमी आपल्यासाठी वाराणसीच आहे. कारण आपण सदैव ब्रह्मभावात असता.

**अनंत कोटी ब्रह्मांडनायक भगवान योगीराज सद्गुरू वामनरावजी गुळवणी महाराजांचे वर्णन श्रीमत् आद्य शंकराचार्यांच्या या सुयोग्य शब्दांखेरीज करताच येत नाही. त्यांनी घडवलेली हि कलाकृती त्यांच्याच चरणी सादर समर्पण .**

विषयानुक्रम

**श्रीमद्भागवत सहावा स्कंध सुरु**

पुष्प ८० वे पातकांच्या समूळ नाशाचा उपाय

पुष्प ८१ वे प्राचेतस दक्षाचा जन्म

पुष्प ८२ वे नारदांना दक्षाचा शाप

पुष्प ८३ वे देवगुरु विश्वारुपाचा इंद्राकडून वध

पुष्प ८४ वे इंद्र वधासाठी वृत्रासुराचा जन्म

पुष्प ८५ वे इंद्र व वृत्रासुर संवाद

पुष्प ८६ वे वृत्रासुराचा वध

पुष्प ८७ वे वृत्रासुराचे पूर्वजन्मीचे चरित्र

पुष्प ८८ वे चित्रकेतूंला विरक्ती व संकर्षण दर्शन

पुष्प ८९ वे चित्रकेतूंला मृडानीचा शाप

पुष्प ९० वे दितीचे व्रताचरण

पुष्प ९१ वे मरुद्‌गणांची उत्पत्ती

**श्रीमद्भागवत सातवा स्कंध सुरु**

पुष्प ९२ वे जय-विजय व हिरण्यकशिपू कथा

पुष्प ९३ वे हिरण्यकशिपूचे तप व ब्रम्हदेवांचे वरदान

पुष्प ९४ वे प्रल्हादाच्या वधाचे प्रयत्न

पुष्प ९५ वे प्रल्हादाचा असुर बालकांना हरिनामाचा उपदेश

पुष्प ९६ वे भगवान श्रीनृसिंह अवतार व हिरण्यकशिपू वध

पुष्प ९७ वे प्रल्हादकृत नरसिंह स्तुति

पुष्प ९८ वे प्रल्हादास राज्याभिषेक व त्रिपुरदहनाची कथा

पुष्प ९९ वे धर्म निरुपण

पुष्प १०० वे गृहस्थाचे सदाचार व मोक्ष धर्म

**श्रीमद्भागवत आठवा स्कंध सुरु**

पुष्प १०१ वे गजेंद्रमोक्ष कथा(अ

पुष्प १०२ वे सागरमंथन(अध्याय ५, ६, ७ पूर्ण )

पुष्प १०३ वे अमृत प्राप्ती(अध्याय ८ व ९ पूर्ण)

पुष्प १०४ वे देवासुर संग्राम(अध्याय १० व ११)

पुष्प १०५ वे भगवान शिवांना मोहिनीचे दर्शन

पुष्प १०६ वे बलीचा स्वर्गावर विजय

पुष्प १०७ वे वामनाची त्रिपाद भूमीची याचना

पुष्प १०८ वे वामनाचे विश्वरूप

पुष्प १०९ वे बलीचा सुतलात प्रवेश(अध्याय २२ व २३ )

पुष्प ११० वे भगवंताचा मत्स्यावतार(अध्याय २४)

**श्रीमद्भागवत नववा स्कंध सुरु**

पुष्प १११ वे वैवस्वत मन्वंतराची सुरुवात

पुष्प ११२ वे वैवस्वत मनूची संतती व सुकन्या-च्यवन कथा

पुष्प ११३ वे कुकुद्मी व नाभाग (अध्याय ३ पूर्ण ४ चालू)

पुष्प ११४ वे राजा अंबरीष (अध्याय ४ व ५ पूर्ण)

पुष्प ११५ वे मांधाता व सौभरी कथा (अध्याय ६ पूर्ण)

पुष्प ११६ वे राजा हरिश्चंद्र व सगर

पुष्प ११७ वे राजा भगीरथ

पुष्प ११८ वे राजा सौदास व राजा रामचंद्र

पुष्प ११९ वे श्रीरामचरित्र

पुष्प १२० वे इक्ष्वाकुवंश(अध्याय ११, १२ व १३ पूर्ण)

पुष्प १२१ वे सोमवंश(अध्याय१४)

पुष्प १२२ वे ऋचिक, जमदग्नी व परशुराम(अध्याय१५)

पुष्प १२३ वे परशुरामांचा क्षत्रिय संहार(अध्याय१६)

पुष्प १२४ वे आयूचा वंश व ययाती(अध्याय १७ व १८)

पुष्प १२५ वे ययातीचा गृहत्याग व पुरुवंश

पुष्प १२६ वे भरतवंश व रंतिदेव,अजमीढ, द्रुपद

पुष्प १२७ वे कौरव व मगध वंश(अध्याय २२)

पुष्प १२८ वे अनु, द्रुह्यु, तुर्वसू व यदुवंश(अध्याय २३)

पुष्प १२९ वे विदर्भ वंश (पुढे चालू) (अध्याय २४ पूर्ण)

# लेखकाचा अल्पपरिचय



श्री अविनाश नगरकर हे बहुआयामी व्यक्तिमत्व आहे. सद्गुरूंवरच्या निष्ठेनी सर्व काही साध्य होते अशी त्यांची श्रद्धा आहे. भारतीय परंपरेतील सद्गुरूंचे स्थान त्यांनी जाणले आहे. अध्यात्मिक विचारांचा वारसा हा या कुटुंबाचा विशेष आहे. वडील व आजोबांकडूनच तो मिळाला असल्याचे ते मानतात. सर्वात महत्वाचे म्हणजे सन १९६७ मध्ये त्याना प्राप्त झालेला योगिराज प.पू. वामनरावजी गुळवणी महाराज, पुणे यांचा अनुग्रह. त्यांच्या मार्गदर्शनानुसार केलेल्या साधनेचे व अध्ययनाचे फळ म्हणजे त्यांचे आजचे यश असे ते ठामपणे सांगतात.

श्री अविनाश नगरकर हे ठाणे येथे मायर्स ऍंड वास्प या पंप बनवणाऱ्या कंपनीतून प्रोजेक्ट मॅनेजर म्हणून निवृत्त झाले. नोकरीवर असतानाच त्यांनी सामाजिक कार्य आणि लिखाण सुरू केले. अनेक संस्थांचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले. यात ग्राहक पंचायत, विविध आध्यात्मिक आणि सांस्कृतिक संस्था आहेत. वयाच्या ५६व्या वर्षी कॉम्प्युटर शिकून त्यांनी त्यावर लिखाण सुरू केले. आजवर त्यांची श्री आद्य शंकराचार्य, समर्थ रामदास स्वामी यांच्याबद्दलची पुस्तके प्रकाशित झाली आहेत. त्याशिवाय त्यांची ज्ञानेश्वरी, नवनाथ भक्तीरसामृत, एकनाथी भागवत, आणि श्रीमद्भागवत यांविषयावरची चातुर्मास प्रवचनेही खूप गाजली.

सन १९८४ नंतर त्यांच्या सामाजिक कार्याचे धुमारे फुटू लागले. अनेक सामाजिक, सांस्कृतिक व धार्मिक संस्थांचे ते अध्यक्ष म्हणून जबाबदारी पार पाडतात. ज्ञानेश्वरीवर अधिकारवाणीने प्रवचन करणे हा त्यांचा हातखंडा आहे. श्रीमत् आद्य शंकराचार्य ह्या पुस्तकातील भाषासौष्ठव व कथाभागाची अलगदपणे उलगडणारी घडी वाचकांचे मन भारून टाकते.

अध्यात्म आणि इंजिनियरिंग व्यतिरिक्त अनेक कलांमध्येही श्री अविनाश नगरकर पारंगत असून चित्रकला व शिल्पकलेतील त्यांचे काम वाखाणले जाते.

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत

## पुष्प १ ले

## मनोगत

श्रीमद्भागवत म्हणजेच भगवद्गीता असा अनेक जणांचा समज असल्याचे लोकांच्या विचारण्यावरून, बोलण्यावरून लक्षात आले. म्हणून आपल्या या अलौकिक ग्रंथाची थोड्या प्रमाणात का होईना ओळख व्हावी म्हणून हा लेखन प्रपंच करण्याचे ठरवले आहे. कुतूहल म्हणून अनेकजण मराठी अनुवाद असलेले भागवत वाचायला घेतात पण नंतर कंटाळून ठेवून देतात. भागवताशी मैत्री जोडल्या खेरीज त्यातील अवीट गोडी चाखता येत नाही हेच खरे. भागवतात भगवद्भक्ती व अध्यात्म यांची गोष्टी रूपाने कशी सांगड घातली आहे हे खरोखरच वाचण्यासारखे आहे. त्याची थोडी ओळख व्हावी असे वाटले म्हणून ही पुष्पे सदर करीत आहे. त्यासाठी मूळ भागवत संहिता अभ्यासून मग त्यातल्या निवडक श्लोकांचा उपयोग केलेला आहे. ऐकींव अथवा काल्पनिक गोष्टी यात नाहीत. गर्भित अर्थाच्या अनुषंगाने केलेला अनुवाद आहे. भागवत ग्रंथ म्हणजे भगवद्भक्तीतला एक महान चमत्कार आहे. श्रीमद्भागवतातल्या बाराव्या स्कंधातल्या तेराव्या अध्यायात सूतमुनी म्हणतात

श्रीमद्भागवतं पुराणममलं यद्वैष्णवानां प्रियं यस्मिन् पारमहंस्यमेकममलं ज्ञानं परं गीयते ।

तत्र ज्ञानविराग भक्तिसहितं नैष्कर्म्यमाविष्कृतं तत् शृण्वन् प्रपठन् विचारणपरो भक्त्या विमुच्येन्नरः।।१८।।

अर्थात "श्रीमद्भागवत पुराण हे अत्यंत निर्दोष आहे. ते वैष्णवांना फार प्रिय आहे. ह्या पुराणात मायेपासून अलिप्त असलेल्या परमहंसांच्या अद्वितीय ज्ञानाचे वर्णन केले आहे. या ग्रंथात ज्ञान,वैराग्य व भक्ती यांच्यासह नैष्कर्म्य होण्याचा मार्ग दाखवला आहे. अशा या भागवत ग्रंथाचे भक्तीने श्रवण, मनन व चिंतन करणारा मनुष्य खात्रीने मुक्त होतो." ह्या वरून भागवताचे महत्व किती आहे हे लक्षात येईल. पण संस्कृत न समजण्यामुळे अनेक जण भागवत वाचण्याचा कंटाळा करतात. भागवतातल्या ज्ञानाची ओळख व्हावी हा हेतू या लिखाणा मागे आहे. सद्गुरुकृपेनेच हे होईल अशी आशा आहे. त्यामुळे सद्गुरु चरणी तशी प्रार्थना आहे.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

**अविनाश महादेव नगरकर., ३/२३ थोमस स्ट्रीट, क्लेफिल्ड, ब्रिस्बेन, ऑस्ट्रेलिया.**

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८० वे (अध्याय १ व २ पूर्ण )

## पातकांच्या समूळ नाशाचा उपाय

परीक्षित राजा म्हणाला, "हे मुने! नरक यातनांच्या भयामुळे मनुष्य प्रायश्चित्त घेतो. पण त्याच्याकडून पुन्हा पुन्हा पाप घडतेच. हे म्हणजे हत्तीच्या स्नानासारखे होते. स्नान करायचे आणि मग आपल्याच सोंडेने अंगावर धूळ पसरवायची. त्यासाठी यमयातना चुकवण्याचा खात्रीचा उपाय कोणता?"

शुकमुनी म्हणाले " राजन्! त्यासाठी ज्ञान हा एकमेव उपाय आहे. इतकेच नाही तर मृत्युसमयी जरी हरीनाम घेतले तरी नरक यातना चुकतात. त्याचा पुरातन इतिहास ऐक. कान्यकुब्ज नगरीत अजामिळ नावाचा एक सदाचारी ब्राम्हण रहात होता. पण तो एका गणिकेवर मोहित होऊन पुरा अनाचारी झाला. पतिव्रता पत्नीचा त्याग करून लुटमारी व चोऱ्या करून त्या गणिकेकडे राहू लागला. गणिकेपासून त्याला सहा पुत्र झाले. सगळयात लहान मुलाचे नाव त्याने नारायण ठेवले. त्या नारायणावर त्याचा जीव कीं प्राण होता. अजामिळ अठ्ठ्याऐंशी वर्षाचा झाल्यावर त्याचा काळ आला व यमदूत त्याला नेण्यास आले. त्याला यमदूतांचे दर्शन होताच त्याने जीवाच्या आकांताने आपला पुत्र नारायण याला हांक मारली. यमदूतांनी अजामिळाचे प्राण खेचून बाहेर काढताक्षणीच हरीनामधारकाचे सतत रक्षण करणारे भगवान श्रीविष्णूंचे पार्षद तिथे प्रकट झाले व त्यांनी अजामिळाचे प्राण अलगद त्यांच्या पाशातून काढून घेतले. तेंव्हा आश्चर्यचकित होऊन यमदूतांनी विष्णुदूतांना अडथळा करण्याचे कारण विचारले.

विष्णुदूत म्हणाले, " यमदूत हो! तुम्ही यमधर्माच्या आज्ञेचे पालन करणारे आहात! तर धर्मतत्त्व आणि दंडपात्रतेचे लक्षण विशद करा!" यमदूत म्हणाले, " अंतर्यामिरुपी देहातील यमधर्म जीवाचे धर्माधर्म कृत्य मनाने अवलोकन करून त्याप्रमाणे शुभाशुभ फळ जीवाला परलोकी भोगावयास लावतो. हा अजामिळ पूर्वी सदाचार संपन्न होता. पितृआज्ञेने वनातून समिधा आणताना मार्गात एका पुरुषाचा व एका विवस्त्र गणिकेचा एकांत पाहून अजामिळ त्या गणिकेवर मोहित झाला. आणि मग तिच्याकडे जाऊन अधर्माचरण करू लागला. म्हणून याला दंडाने शुध्द करण्यासाठी नेत आहोत."

विष्णुदूत म्हणाले, " हे धर्म पालकानो! ते ठीक आहे. पण आणखी एक गोष्ट आपण लक्ष्यात ठेवा कीं तान्हुले बालक ज्या विश्वासाने आईच्या मांडीवर झोपते त्या विश्वासाला आई कधीही तडा जाऊ देत नाही त्याच प्रमाणे हे सर्व विश्व त्या नारायणाचे अपत्य आहे! त्या नारायणास जो कोणी जीवाच्या आकांताने हांक मारतो त्याच्यासाठी तो धावतो. नुसत्या हरिनामाने अनंत पाप राशी लयास जातात. इथे तर अजामिळाने पुत्रमिषाने का होईना पण नारायणास हांक दिली आहे. नामोच्चार करणाऱ्या जीवाबद्दल त्या जीवाच्या रक्षणाची बुद्धी नारायाणास उत्पन्न होते. यमदूत हो! अजाणता जरी अग्नीवर पाय पडला तरी तो भाजतोच तसेच अजाणता जरी पवित्रकीर्ती श्रीहरीचे नाम घेतले तरी ते तेजस्वी नामस्मरण मनुष्याची पतके दग्ध करते. रोग्याला जसे औषधाचे ज्ञान नसताना ते घेतल्याने गुण येतो तसेच नामस्मरणाचे आहे. वेदांनी यासाठीच नामाचा महिमा गाईलेला आहे." यमदूत अजामिळाला न घेता निघून गेले. यमपाशातून मुक्त झालेला अजामिळ शुद्धीवर आला. हर्षभराने त्याने विष्णुदूतांना नमस्कार केला. अजामिळ विष्णुदूतांशी काही बोलणार इतक्यात ते गुप्त झाले. अजामिळाने तत्क्षणी विचार केला कीं, आपल्या सर्व अधम व नीच कृत्यांचे नारायणाच्या एका नामोच्चाराने भस्म झाले आहे. तर आता पुनश्च पाप घडू नये म्हणून मी माझे मन एकाग्रतेने भगवंताच्या नामस्मरणात ठेवीन.

असा दृढ निश्चय करून तो सर्वसंग परित्याग करून हरिद्वारला आला. देहावरील आसक्ती सोडून त्रिकाळ गंगास्नान करून हरीचे नामस्मरण करू लागला. त्याला ईश्वरभेटीची तीव्र ओढ लागली. तेंव्हा त्याला पुन्हा त्याच विष्णुदूतांचे दर्शन झाले. अजामिळाने त्यांना साष्टांग दंडवत घातले. विष्णुदूतांनी त्याला देहातून बाहेर काढले व पार्षदाचे रूप देऊन विमानात बसवून वैकुंठाकडे गमन केले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८१ वे (अध्याय ३ व ४ पूर्ण )

## प्राचेतस दक्षाचा जन्म

यमदूतांनी अजामिळाला न आणता आल्याचे समग्र वृत्त यमधर्मांना सांगितले. त्यावेळी यमदूतांनी व्यक्त केलेला खेद दूर करण्यासाठी यमधर्म म्हणाले. " दूत हो! ज्या परब्रह्मापासून ब्रम्हा, विष्णू व महेश उत्पन्न होऊन ह्या विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करतात ते स्थावर व जंगमासह संपूर्ण विश्वाचे पालनकर्ते व श्रेष्ठ अधिकारी 'नारायण', 'वासुदेव', श्रीहरी इत्यादी नावांनी जाणले जातात. त्यांचे दूत अथवा पार्षद संपूर्ण त्रैलोक्यात त्यांचे स्मरण करणाऱ्यांच्या रक्षणासाठी फिरत असतात. पण हे धर्मरहस्य फक्त ब्रम्हदेव, नारद, महेश, सनकादिकुमार, कपिल, मनू, प्रल्हाद, भीष्म, बली, शुक व मी असे आम्ही सर्वजण संपूर्ण जाणतो. त्याधर्माचे महत्व इतके आहे कीं पुत्राला जरी ते नाव ठेवले व मृत्यू समयी प्राणपणाने त्याला जरी हांक मारली तरी तो यमपाशातून मुक्त होतो. वेदांनी प्रतिपादन केलेल्या द्वादशाब्दादि प्रायश्चित्तासाठी धर्म पंडितांचा आग्रह असतो. हरीनामस्मरणा सारख्या प्रभावी व रहस्यमय साधनावर त्यांचे मनच एकाग्र होत नाही. भगवान श्रीहरीच्या नमसंकीर्तनाने सर्व पातकांचा नाश होतो. म्हणून तुम्ही त्यांना आणू नका. पशूवत उपभोग घेणाऱ्या लोकांनाच फक्त तुम्ही उचलत जा!" आपल्या स्वामींनी सांगितलेले ऐकून यमदूत नि:संशय होऊन कार्य मग्न झाले.

तन्मयतेने श्रवण करीत असलेल्या परीक्षित राजाला शुकमुनी पुढे म्हणाले, " पूर्वी सांगितलेल्या प्राचीनबर्हीच्या पुत्रांना म्हणजे प्रचेत्यांना भगवंताच्या आज्ञेनुसार प्रम्लोचा नामक अप्सरेच्या कन्येचा स्वीकार करावयाचा होता. परंतु वृक्षांनी इतका बंदोबस्त केला होता कीं आत शिरकाव करणेच कठीण होते. म्हणून प्रचेत्यांनी आपल्या मुखातून अग्नी व वायू उत्पन्न करून वनात प्रवेश मिळवण्यासाठी वृक्ष दग्ध करायला सुरुवात केली. तेंव्हा वृक्षांचा अधिपती सोम त्या ठिकाणी प्रकट झाला व त्याने सर्व शांत करून प्रचेत्यांना कन्यादान केले. कालांतराने प्रचेत्यांपासून प्रम्लोचा कन्या वार्क्षीला दक्ष नामक पुत्र झाला. तो प्राचेतस दक्ष म्हणूनच ओळखला जातो. ह्या दक्ष प्रजापतीने मनोमात्र आकाश, भूमी, जल, ह्यात वास्तव्य करणाऱ्या प्रजा केवळ संकल्पाने उत्पन्न केल्या. पण त्या वृद्धिंगत होईनात. म्हणून ह्या प्राचेतस दक्षाने

विंध्याचलपर्वतावर असलेल्या अघमर्षण नामक तीर्थाच्या ठिकाणी जाऊन "हंसगुह्यक" स्तोत्राच्या पाठाने तप आरंभले. अत्यंत विशुद्ध भावाने त्रिकाळ स्नान करून व व्रतस्थ राहून तप केल्यामुळे श्रीहरी त्याच्यावर प्रसन्न झाले.

भगवान श्रीहरी दक्षाच्या समोर प्रकट होताच दक्षाने त्यांना साष्टांग नमस्कार केला. त्याचे अष्टसात्विक भाव जागे झाल्यामुळे त्याच्या कंठातून शब्द फुटेना. तेंव्हा त्याचे मनोगत जाणून श्रीहरी त्याला म्हणाले, " हे महातपस्वी प्राचेतस दक्षा! तुझ्या उत्कट श्रद्धा व भक्तिप्रेम यामुळे मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तूं आता पंचजन नामक प्रजापतीच्या असिक्नी नामक कन्येशी विवाह करून रतिरुपधर्माने प्रजोत्पादन कर. आता या पुढे स्त्री-पुरुष संबंधातूनच प्रजा उत्पन्न होत राहील." इतके सांगून भगवान श्रीहरी अंतर्धान पावले. त्या दक्षाच्या प्रजेनेच हे सर्व जग भरून गेले आहे.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८२ वे (अध्याय ५ व ६ पूर्ण )

### नारदांना दक्षाचा शाप

भगवान श्रीहरीच्या मायाशक्तीचे सामर्थ्य प्राप्त झालेल्या प्राचेतस दक्षाला दहा हजार पुत्र झाले. त्यांचे नाव हर्यश्व असे ठेवले. पितृ आज्ञे प्रमाणे प्रजोत्पादन योग्य रित्या व्हावे म्हणून ते सिंधू नदीच्या समुद्र संगमस्थानी असलेल्या नारायण तीर्थावर तपाचरण करू लागले. त्यांना त्या तपा मुळे विरक्ती प्राप्त झाली. पण पितृआज्ञा लक्षात घेऊन ते तप करीत राहिले. त्यावेळी त्रैलोक्य संचार करणारे नारद तिथे आले. त्यांच्याशी संवाद होऊन हर्यश्व अधिकच विरक्त झाले व नारदांचा अनुग्रह प्राप्त करून मोक्ष मार्गाचे अधिकारी झाले. आपल्या सर्व पुत्रांना नारदांनी मोक्षमार्गावर पाठवल्याचे दक्षाला समजले. तेंव्हा दक्षाला अत्यंत शोक झाला. दक्ष मनाशी म्हणाला उत्तम संतान सुद्धा हे अशा प्रकारे शोकाला कारणीभूत होऊ शकते अशी ही प्रकृती आहे! तेंव्हा साक्षात् ब्रम्हदेव प्रकट झाले व त्यांच्या उपदेशाने दक्ष शांत झाला. दक्षाने पुनश्च असिक्नीच्या ठिकाणी शबलाश्व नावाचे एक हजार पुत्र उत्पन्न केले. तेही नारायण तीर्थावर तपाला गेले. तिथे परत त्यांची व नारदांची भेट झाली. त्यांनीही नारदांचा अनुग्रह घेतला व मोक्ष मार्गात रममाण झाले.

दक्षाला हे समजल्यावर तो अतांत संतापला. इतक्यात नारदच त्याला भेटण्यास आले. पण त्या संतापलेल्या अवस्थेत पुत्र विरहाचे कारण नारद समोर दिसताच त्याने नारदांना शाप दिला " कर्ममर्यादा पळून सदाचाराने वागणाऱ्या गृहस्थाला तूं पुत्र वियोगाचे दु:ख दिले आहेस म्हणून तुला त्रैलोक्यात कुठेच निश्चल स्थान प्राप्त होणार नाही." हरीनामस्मरणाने नारद इतके शांत झालेले होते कीं "तथास्तु" म्हणून त्यांनी तो शाप सहज स्वीकारला.

शुकाचार्य पुढे सांगू लागले, " राजन्! त्या नंतर ब्रम्हदेवांनी परत एकदा दक्षाचे सांत्वन केले. त्यानंतर दक्षाला असिक्नीपासून साठ कन्या झाल्या. त्या कन्यांनी आपल्या पित्याचा प्रजोत्पादनाचा संकल्प पूर्ण केला. दक्षाने दहा कन्या धर्माला अर्पण केल्या. कश्यपाला तेरा कन्या अर्पण केल्या. तार्क्षकश्यपाला चार. चंद्राला सत्तावीस. भूत, अंगिरा व कृशाश्व ह्या तिघांना प्रत्येकीं दोन दोन कन्या अर्पण केल्या. ह्या साठ दक्ष

कन्यांच्या संततीने संपूर्ण विश्व भरून गेले आहे. यांच्या पैकी विशेष संतती अशी कीं धर्माला विद्यापोत, देवऋषभ, संकट, स्वर्ग, विश्वदेव, साध्यगण, मरुत्वान, जयंत, मुहूर्त, संकल्प, अष्टवसू इत्यादी पुत्र झाले. त्यांची संतती वाढत गेली. भूतनाथ ऋषींना अनेक रुद्र व रुद्रगण म्हणजे भूत, प्रेत, विनायक इत्यादी महा भयंकर प्रजा झाली. तार्क्षकश्यपांना अरुण (सूर्याचा सारथी), गरुड (भगवान विष्णूंचे वाहान), शेष, वासुकी इत्यादी नाग, अनेक पक्षी, टोळ इत्यादी प्रजा झाली. राजन्! ज्यांच्या संततीने हे जग व्यापले आहे त्या कश्यपांच्या संततीचे पुण्यकारक श्रवण कर.

दक्षाने कश्यपांना तेरा कन्या दिल्या त्यातल्या १. अदितीला जी संतती झाली ते सगळे आदित्य. २. दितीला जी संतती झाली ते सर्व दैत्य. ३. द्नुला जी संतती झाली ती दानव. ४. तिमी नामक पत्नीला सगळे जलचर व जंतूं झाले. ५.काष्ठेला एक खुराचे पशु झाले. ६.इला नामक पत्नीला वृक्ष झाले. ७.मुनी नामक पत्नीला अप्सरा झाल्या. ८.क्रोधवशा नामक पत्नीला साप, विंचू, इत्यादी विषारी दंदशूक पुत्र झाले. ९.ताम्रा नामक पत्नीला श्येन, गृध्र, इ. क्रूर पक्षी झाले. १०.सुरभी नामक पत्नीला दोन खुरांचे पशु झाले. ११. अरिष्टा नामक पत्नीला गंधर्व झाले. १२. सुरसेला यातुधान झाले. १३.सरमेला सगळी श्वापदे झाली. राजन्! अदितीच्या संतती पैकी अर्यमा नामक आदित्याच्या संततीत पूर्वापार अनुसंधान साधण्याचा असामान्य असलेला गुण पाहून ब्रम्हदेवांनी त्यांना मानव म्हणून पृथ्वीवर पाठवले. त्वष्टा नामक आदित्याला रचना नावाची दितीच्या वंशातली म्हणजे दैत्यांच्या वंशातली पत्नी होती. तिला संनिवेश व विश्वरूप असे दोन महा पराक्रमी पुत्र झाले.

देवांचे गुरु बृहस्पती यांचा इंद्राकडून एकदा घोर अपमान झाला व ते अदृश्य झाले. तेंव्हा विश्वारूपाचे मातुल घराणे दैत्यांचे असूनही ब्रम्हदेवांच्या सांगण्यावरून इंद्राने विश्वारुपालाच आपले गुरु केले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८३ वे (अध्याय ७ पूर्ण व ८ चालू)

## देवगुरु विश्वारुपाचा इंद्राकडून वध

परीक्षित राजाने बृहस्पतींनी देवांचा कोणत्या अपराधामुळे त्याग केला? असे विचारले म्हणून शुकमुनी सांगू लागले, " राजन्! गुरु बृहस्पतींच्या मुळे इंद्राला असामान्य वैभव प्राप्त झाले होते. पण त्या वैभवामुळे इंद्र इतका उन्मत्त झाला कीं एकदा आपल्या ऐश्वर्यशाली सभेत तो इंद्राणीसह अप्सरांचे नृत्य पहात बसलेला असताना त्या सभेत देवगुरु बृहस्पतींचे आगमन झाले. पण इंद्राला आपल्या ऐश्वर्याची इतकी धुंदी चढली होती कीं ज्यांच्या कृपेने आपल्याला इतके प्रचंड ऐश्वर्य प्राप्त झाले त्या आदरणीय गुरूंना आलेले पाहून त्यांचे आदराने स्वागत तर सोडाच पण इंद्राने त्यांची दाखलही घेतली नाही.

अशाप्रकारची उपेक्षा बृहस्पतीना सहन झाली नाही. ते त्वरित आल्या पावली सभात्याग करून निघून गेले. आपले गुरु नाराज होऊन परत गेल्यावर इंद्राला स्वत:ची चूक जाणवली! तो तांतडीने बृहस्पतींची क्षमा मागण्यासाठी त्यांच्या प्रासादात गेला. पण ते अंतर्धान पावल्यामुळे कुणालाच सापडू शकले नाहीत. देवगुरु बृहस्पती अंतर्धान पावल्याने देवांचे गुरूंचे संरक्षण नष्ट झाल्याचे दैत्याना समजले. त्यांनी लगेच आपले गुरु शुक्राचार्यांना कळवले. व त्यांच्या संरक्षणाखाली देवांवर स्वारी करून देवांची दाणादाण उडवायला सुरुवात केली. देवांची दुर्दशा सहन न होऊन इंद्र ब्रम्हदेवांना शरण गेला. तेंव्हा ब्रम्हदेव म्हणाले, " इंद्रा! इंद्रियदमन केलेल्या गुरूंचा अपमान हे एकच कारण तुझ्या पराभवाचे आहे. तर गुरूंचा आदर,सत्कार व सन्मान हे दैत्यांच्या विजयाचे कारण आहे. तूं केलेल्या घोर अपमानामुळे सध्यातरी बृहस्पती परत येतील असे दिसत नाही. त्यामुळे सध्या तुम्ही त्वष्टा पुत्र विश्वरुपाला त्याचा सन्मान व सत्कार करून शरण जा! तो तुमचे मनोरथ पुरे करील. पण एक गोष्ट लक्षात ठेव कीं त्याचे मातुल घराणे दैत्याचे आहे. त्यामुळे तो दैत्यांचा पक्षपाती आहे. पण ते तुला सहन करावे लागेल. मगच तुमचे मनोरथ पूर्ण होतील.

इंद्र लगेच विश्वारुपांच्या आश्रमात आला. त्यांची भरपूर स्तुती केली व मनधरणी करून त्यांना देवांचे गुरुपद भूषवण्याची विनंती केली. विश्वरूप महातपस्वी होता. त्याने अति मधुर भाषेत उत्तर दिले.

तो म्हणाला, " इंद्रा! उपाध्यायपण हे ब्रम्हतेजाचा क्षय करणारे आहे. तथापि आपल्या सारख्या ज्येष्ठ लोकपालाची मागणी मी अमान्य करणार नाही. पण मनापासून त्याचा स्वीकारही करु शकणार नसल्यामुळे तुमचे वैभव तुम्हाला परत मिळवून देईन असे आश्वासन नक्कीच देतो."

इंद्राला आपल्या वैभवात रस असल्यामुळे त्याने ते लगेच मान्य करून त्याला आपले आचार्यत्व बहाल केले. इंद्राच्या दीर्घ प्रयत्ना नंतर विश्वरूपाने ते स्वीकारले. मग विश्वरूपाने वैष्णव विद्येतल्या नारायणकवचाच्या योगाने देवांचे संरक्षण करून त्यांचे त्रैलोक्य वैभव पुन्हा प्राप्त करून दिले. विश्वरूपाने अत्यंत उदार मनाने इंद्राला नारायण कवच रूप गुह्यविद्या शिकविली. विश्वरुपाकडून प्राप्त झालेल्या विद्येच्या जोरावर इंद्राने आपले गेलेले वैभव परत मिळवले व पुर्ववत् उपभोग घेऊ  लागला. शुकमुनी पुढे सांगू लागले, "राजन्! विश्वारुपाला तीन मस्तके होती. इंद्रासाठी तो जेंव्हा यज्ञ करीत असे तेंव्हा देवांचा उच्चार करून प्रकटपणे हविर्भाग अर्पण करी. परन्तु विश्वरूपाची माता रचना ही दैत्य कन्या असल्याने तो इंद्राच्या प्रत्येक यज्ञात दैत्यांनाही गुपचूप हविर्भाग अर्पण करी. त्याचे हे धर्मकपट इंद्राच्या लक्षात येताच इंद्राने विश्वरूपाची तिन्ही मस्तके उडवली.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८४ वे (अध्याय ८ व ९ पूर्ण )

## इंद्र वधासाठी वृत्रासुराचा जन्म

विश्वरूपाची हत्या केल्यामुळे इंद्राला ब्रम्हहत्येचे पातक लागले. ते पातक इंद्राने एक संवत्सर भोगायचे टाळले. त्यामुळे सर्वजण त्याला ब्रम्हघातकीं म्हणू लागले.

हा लोकापवाद दूर करण्यासाठी इंद्राने तडजोड करून ते पातक चार जणांमध्ये वाटून दिले.

भूमीने आपल्यातला खळगा भरून निघावा या बोलीवर एक चतुर्थांश भाग घेतले. वृक्षांनी एक चतुर्थांश भाग आमचे छेदन केले तरी नवीन पालवी फुटत राहावी या बोलीवर घेतले. वृक्षांमध्ये ते डिंकाच्या रूपाने दिसते. स्त्रियांनी शाश्वत कामेच्छा रहावी या बोलीवर घेतले. ते स्त्रियांमध्ये मासिक पाळीच्या रूपाने प्रकट होते. एक चतुर्थांश भाग जलाने दुग्धादी पदार्थात मिसळल्यावर त्यात एकरुपत्वाने वृद्धी होण्याच्या तडजोडीने स्वीकारले. ते पाण्यात बुडबुड्याच्या रूपाने प्रकट होते.

आपल्या पुत्राचा वध इंद्राने केल्यामुळे विश्वरुपाचा पिता त्वष्टा अत्यंत संतापला. त्याने  यज्ञ करून इंद्राला मारण्यासाठी एक प्रभावी पुत्र उत्पन्न केला. महाभयंकर रूप व प्रचंड मोठा देह असलेल्या वृत्रासुराने पितृआज्ञे प्रमाणे लगेच देव लोकातल्या देवांना क्षणातच आपल्या हातांच्या विळख्यात बंदिस्त करून त्यांची सगळी शस्त्रास्त्रे गिळून टाकली. सर्व देव निष्प्रभ झाले. इंद्र प्राणभयाने व्याकुळ झाला. त्याने कळवळून श्रीहरीचा धावा केला. त्याच्या बरोबर इतरही सगळे देव अंतर्यामित्वाने श्रीहरीची करुणा भाकून स्तुती करू लागले. देव मनोमन प्रार्थना करीत होते कीं हे देवाधिदेवा! पंचमहाभूतांसह यच्चयावत् शक्तींना तूंच उत्पन्न केले आहेस! जिथे भयलाही  तुझे भय वाटते तिथे इतरांचे काय? त्यामुळे हे देवाधिदेवा धाव घे आणि या महाभयंकर वृत्रासुरापासून आमचे रक्षण कर!

जीवाच्या आकांताने केलेल्या या प्रार्थनेमुळे भगवान श्रीहरी शंख, चक्र, गदा, पद्म धारण करून चतुर्भुज स्वरुपात त्यांच्या समोर प्रकट झाले व म्हणाले, " देव हो! तुम्हा सर्वांचे कल्याण असो! तुम्ही त्वरित दधिचीमुनींकडे जा! विद्या, तप व व्रता सह त्यांनी अश्वशिरस नामक ब्रम्हविद्या आपल्या शरीरात जिरवून

स्वत:चे शरीर दिव्य व पवित्र केले आहे. तीच विद्या त्यांनी अश्विनीकुमारांना देऊन अमरत्व प्राप्त करवून दिले आहे. नारायण कवच हे माझे स्वरूप असलेले कवच आहे. दधिचीमुनिंनीच ते त्वष्ट्याला शिकवले आहे. त्वष्ट्याने ते विश्वरुपाला शिकवले होते. आणि आता इंद्रा तूंही ते धारण केले आहेस. तर तुम्ही दधिचीमुनींकडे जाऊन त्यांच्या दिव्य शरीराची याचना करा. त्यांच्या अस्थिंपासून तुम्ही विश्वकर्म्याकडून वज्रास्त्र बनवून घ्या. मग माझ्याच तेजापासून उत्पन्न झालेल्या इंद्रा तूं त्या वज्रास्त्राने वृत्रासुराचे मस्तक धडावेगळे कर. आणि तुमची सगळी शस्त्रास्त्रे परत मिळव." इतके सांगून भगवान श्रीहरी अंतर्धान पावले.

शुकमुनी पुढे म्हणाले, " राजन्! इंद्र लगेच अश्विनिकुमार व इतर देवांसह दधिचीमुनींच्या मुनींच्या आश्रमात आला. त्यांची मागणी समजून घेतल्यावर हसल्यासारखे करून  दधिचीमुनी म्हणाले, " इंद्रा व इतर देवहो, जगण्याची इच्छा असणाऱ्या प्रत्येकालाच आपला देह अत्यंत प्रिय असतो. हे मी आपणास सांगावयास हवे असे नाही. त्यामुळे प्रत्यक्ष भगवान विष्णूंनी जरी सांगितले तरी तो देण्यास सहसा कोणीही उत्सुक नसतो." हे ऐकून देवेंद्र म्हणाला, "हे प्रभो! आपल्या सद्‌गुणाची प्रशंसा सर्वजण करतात. आपल्या सारख्या सत्पुरुषाला कोणतेच कृत्य दुष्कर नाही. शिवाय आपण स्वार्थपरायण नसल्यामुळे आपल्याकडे आम्ही मोठ्या आशेने आलो आहोत. आम्ही संकटग्रस्त नसतो तर आपल्याकडे असली विचित्र याचना केलीच नसती. आपण काहीही देण्यास समर्थ आहात. आपण आम्हाला विन्मुख परत पाठवणार नाही या बद्दल आम्हाला खात्री आहे."

इंद्राची अजिजी पाहून दधिचीमुनींनी आत्मचिन्तनाने स्वत: परब्रम्हात लीन होऊन देह त्याग केला. इंद्राने लगेच त्यांच्या अस्थि विश्वकर्म्याला देऊन त्यापासून वज्र करवून घेतले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

पुष्प ८५ वे (अध्याय १० व ११ पूर्ण )

## इंद्र व वृत्रासुर संवाद

विश्वकर्म्याकडून बनवून घेतलेले वज्र धारण करून इंद्र जेंव्हा ऐरावतावर आरूढ झाला तेंव्हा तो प्रलयकालच्या रुद्रासारखा तेजस्वी दिसू लागला. वृत्रासूर व इंद्र यांचे युध्द पाहाण्यासाठी आकाशात जमलेल्या ऋषींनी इंद्राचे ते तेजस्वी रूप पाहून त्याचा जयजयकार केला. वैवस्वत मन्वंतराच्या (म्हणजे चालू मन्वंतराच्या) पहिल्या युगात (म्हणजे सत्य युगात) त्रेतायुग सुरु होता होता हा संग्राम घडला. वृत्रासुराला मदत करण्यासाठी नमुचि, शंबर, अनर्वा, शंकुशिरा, विप्रचित्ती इत्यादी अनेक दैत्य, दानव, यक्ष, पुढे सरसावले. त्यांनी देवांवर महाभयंकर अस्त्रांचा वर्षाव केला. पण आता श्रीहरीचे पाठबळ मिळवलेल्या देवांनी श्रीहरीच्या कृपेने अंतरीक्षातच त्यांचा वेध घेतला व त्यांचे चूर्ण करून टाकले.

त्याच समयी भगवान श्रीहरीने असुरांचे धैर्य आकर्षित करून घेतले. प्रचंड शस्त्रास्त्र वर्षाव करूनही सगळे देव सुरक्षित असलेले पाहून असुर भयभीत झाले. आणि वृत्रासुराला एकट्याला सोडून पळू लागले. त्यांना थोपवण्यासाठी वृत्रासुर म्हणाला, " वीरहो पळू नका. हरीचिंतनात वीर मरण तुम्हाला मुक्ती देईल. आणि तसे मरण अत्यंत दुर्लभ आहे. ते मरण स्वीकारा! पळू नका" पण पळणाऱ्या दैत्यांचे सगळे धैर्यच भगवंताने आकर्षित करून घेतले असल्याने कोणीच वृत्रासुराचे ऐकण्याच्या मन:स्थितीत नव्हते. हे पाहून त्यांच्या मागे लागलेल्या देवांना उद्देशून वृत्रासुर म्हणाला, " अहो! मातेच्या उदरातून विष्ठेप्रमाणे बाहेर पडलेल्या आणि संग्रमातून पळून जाणाऱ्या भ्याडांच्या पाठी धांवण्याचा तुमचा हा पराक्रम तुम्हाला यश अथवा धर्म या पैकी काहीच प्राप्त करून देणार नाही. त्यापेक्षा माझ्याशी लढा!" असे म्हणून वृत्रासुराने आपले दंड थोपटले व प्रचंड मोठी गर्जना केली.

त्याच्या नुसत्या त्या गर्जनेमुळेच देव धरणीवर मूर्च्छित होऊन पडले. त्या देवांवर थयथया नाचत आपल्या हातातला त्रिशूळ परजून वृत्रासुर इंद्रावर धावला. तेंव्हा संतप्त होऊन इंद्राने आपली गदा त्याच्यावर फेकली. पण वृत्रासुराने ती अंतरिक्षातच पकडून ऐरावतावर फेकली. त्या प्रहाराने ऐरावताचे मस्तक रक्त बंबाळ झाले. ऐरावत सहा धनुष्ये इतके अंतर मागे सरकला. त्याला इंद्राने आपल्या हातातल्या

अमृताने परत भानावर आणला. तो पर्यंत वृत्रासुर शांत उभा राहिला. जेंव्हा इंद्र त्याच्यावर चाल करून आला तेंव्हा आपल्या कणखर व भेदक वाणीने वृत्रासुर म्हणाला, " ब्रम्हघातक्या! गुरुघातक्या, भातृघातक्या इंद्रा! ये तुला मारून मला माझ्या भावाच्या ऋणातून मुक्त होऊ दे! अरे पाप्या, यज्ञदीक्षा घेतलेल्या निष्पाप गुरुंचा तूं शिरच्छेद केला आहेस." आपल्या या वाग्बाणांनी इंद्र हतप्रभ झालेला पाहून वृत्रासुर विकट हास्य करून म्हणाला, "अरे नरभक्षकांच्याही निंदेस पात्र झालेल्या इंद्रा! ये तुझा देह विदीर्ण करून गिधाडांच्या तोंडी देण्यास मी उत्सुक आहे"

आता मात्र इंद्राच्या चेहऱ्यावर भयभीत झाल्याचा भाव स्पष्ट दिसला तेंव्हा त्याला उत्तेजित करण्यासाठी वृत्रासुर पुढे म्हणाला " आणि अरे पापी सुरेश्वरा! जर माझा नाश झाला तर मी निष्पाप असल्यामुळे कर्मबंधातून मुक्त होऊन भगवत्पदी जाईन. कारण मी माझे चित्त त्याच्या चरणकमळी स्थिर केले आहे. अरे तुझा शत्रू तुला मारायला तुझ्या समोर आला आहे आणि तूं जर आपली गदा निष्फळ झाल्याच्या उद्वेगाने हाती असलेल्या वज्रा बाबतही साशंक झाला असशील, तर हे देवेंद्रा ते वज्र श्रीहरीच्या तेजाने व दधिचींच्या तपाने पाजळले गेले आहे. माझा वध इतर कशानेच होणार नसल्याचे जाणूनच भगवान श्रीहरींनी तुला ते प्राप्त करवून दिले आहे. अरे ज्यांचा सहाय्यकर्ता साक्षात् श्रीहरी असतो तिकडेच विजय, लक्ष्मी इत्यादी गुण असतात. त्यामुळे चालव ते वज्र आणि होऊ दे मला श्रीचरणी एकरुप. आणि घे तूं तुझा स्वर्ग भोग! अरे इंद्रा! मला ठार केल्या शिवाय तो सच्चिदानंद तुला स्वर्गादी विषयांच्या संपत्तीचे आधिपत्य मिळूच देणार नाही. कारण सच्चिदानंद ईश्वरा ऐवजी तुला तेच हवे आहे. आणि मला फक्त सच्चिदानंद ईश्वर हवा आहे. "

इतके बोलून वृत्रासुर भगवंताची प्रार्थना करू लागला, " हे भगवन्! तुझ्या चरणकमळांचा आश्रित असलेला हा दास तुझ्यापासून वेगळे राहून कोणत्याही अधिपत्याचीच काय पण मोक्षाचीही अपेक्षा करीत नाही. माझे अंत:करण चतुष्टय तुझ्या ठिकाणी स्थिर होवो."

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

## ।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८६ वे (अध्याय १२ पूर्ण व १३ चालू)

# वृत्रासुराचा वध

भगवंताची प्रार्थना करून तो महाप्रचंड वृत्रासुराने भूमी कंपायमान करीत आपला त्रिशूळ परजवीत त्वेषाने इंद्रावर फेकला. आणि रणभेदी आवाजात ओरडला "हे पापी इंद्रा हा पहा मेलास!"

पण सावरलेल्या इंद्राने वज्र सोडून तो त्रिशूळ व त्रिशूळ सोडणारा वृत्रासुराचा हात छेदून टाकला. हात छेदल्यामुळे संतप्त होऊन वृत्रासुराने दुसऱ्या हाताने इंद्राच्या हनुवटीवर एक जोरदार प्रहर केला. परत येणारे वज्र इंद्राच्या हातात येण्याच्या क्षणीच हे घडले आणि त्या प्रहाराने हातात येत असलेले वज्र इंद्राच्या हातातून निसटून खाली पडले.

इंद्र भांबावला! लज्जित झला. वृत्रासुरासमोर खाली उतरून वज्र हातात घेण्यास त्याला खेद व अपमान वाटू लागला. त्याची ही अवस्था पाहून मोठ्याने हसून वृत्रासुर म्हणाला, " अरे इंद्रा! देहाला सर्वस्व मानून युध्द करणाऱ्याला सतत जय प्राप्त होईलच असे नाही. आणि थोड्याशा पराजयाने अपमानित होऊन जमिनीवर पडलेले वज्र उचलण्यास लाजू नकोस. खरा पुरुषार्थ जाणून घे! सर्व विश्व श्रीहरीच्या स्वाधीन आहे. कीर्ती-अपकीर्ती, यश-अपयश, जय-पराजय, जीवन-मृत्यू इत्यादींच्या बद्दल हर्ष-विषाद न मानता समदृष्टी ठेऊन जिंकण्याच्या इर्षेने युध्द करण्यात खरा पुरुषार्थ आहे. अरे माझे आयुध आणि हात दोन्ही गेले तरी मी पराजय न मानता तुला मारण्याच्या उद्योगाने युध्द करीतच आहे ना? घे ते वज्र उचल. लाजू नकोस. मी आत्मतत्त्वाशी एकरूप झालो आहे. तुझ्या वज्रानेच माझा वध होणार आहे. हे मला ज्ञात असूनही मी यथाशक्ति तुला मारण्याचा प्रयत्न करीतच आहे. युद्धाच्या जुगारात प्राणच पणाला लावावे लागतात. तिथे मान अपमान उपयोगी पडत नाहीत. कोणी तरी एक जण पडल्या शिवाय युध्द संपत नसते."

वृत्रासुराच्या या निष्कपट भाषणाने इंद्र आश्चर्य चकित झाला. वज्र उचलून तो वृत्रासुराला म्हणाला, "तूं जन्मजात निकृष्ट असूनही कृतार्थ झालेला आहेस. तुझे अफाट शौर्य व स्थिर बुद्धी अशा संकट काळी सत्पुरुषांच्या स्वभावासारखी शांत आहे. तूं महान् आहेस! घे शस्त्र हाती मी युद्धास तयार आहे!" इंद्र

युद्धाला तयार झालेला पाहून वृत्रासुराने उरलेल्या हाताने एक परीघ इंद्रावर फेकला. इंद्राने परीघ व वृत्रासुराचा दुसरा हात वज्राने छेदून टाकला. पर्वतप्राय वृत्रासुर जमिनीवर पालथा पडला व त्याने आपल्या असुरी मायेने खालचा ओठ भूमीला टेकवला आणि आपला जबडा उघडला. तो त्याने इंद्राच्या ऐरावतापेक्षा खूपच मोठा केला होता. क्षणातच आपली लवलवणारी जीभ बाहेर फेकून वृत्रासुराने इंद्राला ऐरावतासह आपल्या जिभेत गुंडाळून गिळून टाकले. इंद्राने क्षणात आपले मन या अनपेक्षित घटनेतून बाहेर काढले. व वज्राने प्रथम वृत्रासुराचे पोट विदारण केले व ऐरावतासह बाहेर आला. पुढील संकट टाळण्यासाठी वृत्रासुराचे मस्तक धडावेगळे करण्याच्या संकल्पाने वज्र सोडले.

वृत्रासुराचे मस्तक धडा वेगळे करण्यास वज्राला मानवाच्या कालगणने प्रमाणे एक वर्ष (म्हणजे देवांची एक अहोरात्र) लागले. वृत्रासुराची प्राणज्योत परमात्म्यास जाऊन मिळाली. वृत्रासुराचा वध होताच इंद्र सोडून सर्व देवांना आनंद झाला. आकाशस्थ देव म्हणजे ब्रम्हदेव,भगवान शिव इत्यादी वृत्रासुर मारला जाताच तेथून निघून गेले. इंद्र मात्र धास्तावला. कारण आधीच्या ब्रम्हहत्येचे पातक भूमी, जल, स्त्री, व वृक्ष यांनी वाटून घेतले होते पण आता काय करायचे? इतक्यात अत्यंत घाण वास येणारी एक जख्ख म्हातारी त्याच्याकडे येऊ लागली. ते इंद्राचे ब्रम्हहत्येचे पातक होते. इंद्र पळू लागला. व ती ओंगळ व घाण वास येणारी म्हातारी इंद्राच्या मागे धावत सुटली.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८७ वे (अध्याय १३, १४, १५ )

## वृत्रासुराचे पूर्वजन्मीचे चरित्र

शुकमुनी पुढे सांगू लागले, "राजन्! वृत्रासुराला मारल्यामुळे ब्रम्हहत्येचे जे भयानक पातक इंद्राच्या मागे लागले त्यामुळे जीव नकोस होऊन इंद्र अंतरिक्षात पळू लागला. पातक रुपी ती हिडीस म्हातारी त्याच्या मागे धावू लागली. अस्वस्थ झालेल्या इंद्राने शेवटचा उपाय म्हणून ईशान्येकडे असलेल्या व पापाचा शिरकाव होऊ न शकणाऱ्या मानस सरोवराकडे धांव घेतली. इंद्राने सूक्ष्म रूप धारण केले. व मानस सरोवरातल्या कमळाच्या नालतन्तुत प्रवेश केला. पश्चात्ताप दग्ध होऊन हरिनाम घेत उपाशी राहून कालक्रमणा करू लागला. इंद्र बराच काल भोगरहित अवस्थेत त्या पवित्र सरोवरात राहिल्यामुळे त्याच्या पापांचा हळू हळू क्षय होऊ लागला.

पण आता स्वर्गात राजा नसल्यामुळे इंद्र सांपडेपर्यंत पर्यायी राजा म्हणून पृथ्वीवरील सम्राट नहुषाला सदेह स्वर्गात आणून त्याला देवांचा राजा केले. पण ऐश्वर्य व भोग यांच्या मदाने उन्मत्त होऊन त्याने इंद्रपत्नी शचीची अभिलाषा धरली. तेंव्हा शचीने युक्तीने त्याला ऋषींच्या शापाने सर्प योनीत पोहोचविले.

त्यानंतर ऋषींनी इंद्राचा शोध घेतला व त्याला मानस सरोवरातून बाहेर बोलावले. इंद्राकडून पवित्रस्थानी घडलेल्या हरिनाम कीर्तनाच्या तपामुळे ब्रम्हहत्येचे पातक क्षीण झाले होते. ते आता पूर्ण नष्ट करून इंद्राला पापमुक्त करण्यासाठी श्रीहरीचे आराधन असलेल्या अश्वमेधयज्ञाची दीक्षा ऋषींनी इंद्राला दिली. त्याकाळात व्रतस्थ राहून इंद्राने श्रीहरीस्मरण पूर्वक यज्ञ केला. त्या योगे निष्पाप होऊन इंद्र पुन्हा पूर्वपदी आरूढ झाला.

वृत्रासुराचे हे आख्यान श्रवण करून परीक्षित राजाने विचारले, " प्रभो! असुर असूनही वृत्रासुराची भगवान श्रीहरीच्या ठिकाणी इतकी दृढ वृत्ती कशी काय झाली होती? शिवाय युद्धातल्या कठीण प्रसंगी

स्वपराक्रमाने स्वत:च्या मृत्यूचे भय न बाळगता इंद्रालाही वज्र वापरण्याची प्रेरणा दिली. विशेष म्हणजे त्याला हेही ज्ञात होते कीं वज्रानेच आपल्याला मृत्यू येणार आहे."

शुकमुनी म्हणाले,"राजन्! वृत्रासूर हा पूर्व जन्मीचा चित्रकेतूं नामक तप, विद्या, दान व पावित्र्य यांची मूर्ती असलेला शूरसेन देशीचा सार्वभौम राजा होता. पण अनेक राण्या असूनही निपुत्रिक असल्यामुळे उदासीन होता. एकदा त्याच्याकडे आलेल्या अंगिरामुनींनी त्याला म्हटले, "राजन्! रसनेन्द्रिय, घ्राणेन्द्रीय, स्पर्शेंद्रिय, महत्तत्त्व व अहंकार या सातांच्या निर्दोषत्वात जीवाची स्वस्थता असते. शिवाय तुझे सार्वभौमत्व अबाधित असताना तूं असा खिन्न कां? तेंव्हा चित्रकेतूं राजाने आपले निपुत्रिकपणाचे दु:ख कथन केले. व उपाय करण्याची प्रार्थना केली. अंगिरामुनींनी राजाला पुत्र प्राप्ती होण्यासाठी त्वरित त्वष्ट्याचे यजन करून प्रसाद दिला. त्यायोगे राजाची पट्टराणी कृतद्युतिला पुत्र झाला. पण कृतद्युतिच्या सवतींना द्वेष उत्पन्न झाला व त्यांनी संधी साधून त्या बालकाला विषप्रयोगाने ठार मारले. राजा व कृतद्युति हतबुद्ध व प्रचंड शोक करू लागले. त्यांच्या बरोबर प्रधान व नगरजनही शोकाकुल झाले. त्याच वेळी नारद व अंगिरामुनींचे तिथे आगमन झाले. अत्यंत मृदू व हळू आवाजात ते राजाशी बोलू लागले, " राजन्! तूं ज्याच्यासाठी शोक करीत आहेस तो तुझा पुत्र भूतकाली कोठे होता व आतां भविष्यकाली कोठे आहे? माता-पित्याच्या देहाचे निमित्त होऊन मातेच्या देहापासून पुत्राचा देह उत्पन्न होतो. त्यात पंचमहाभूते जडत्व धारण करतात. व प्राण चैतन्यावस्था निर्माण करतो. ही पंचमहाभूते व प्राण त्या देहाच्या बाबतीत किती निर्विकार असतात याचा थोडा विचार कर. ईश्वराच्या मायेने प्रेरित होऊन पुत्रादी प्राणी पितृत्वाच्या निमित्ताने उत्पन्न होतात. कालांतराने नाशही पावतात. जीवात्मा हा त्या ईश्वराचे सूक्ष्म तत्त्व आहे. आणि सृष्टीची उत्पत्ती ही त्याची क्रीडा आहे."

हे ऐकून चित्रकेतूं म्हणाला, " मी या संसारचक्राच्या सुख-दु:खरुपी महामोहाच्या गर्तेत सांपडलो आहे. आपण मला यातून बाहेर काढा!" तेंव्हा अंगिरामुनी म्हणाले, " पूर्वी मी तुझ्याकडे आलो होतो ते केवळ तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठी. पण त्यावेळी तूं निपुत्रिकतेच्या दु:खाने शोक करीत होतास आणि आज पुत्रवियोगाच्या दु:खाने शोक करीत आहेस. अरे राजा! सर्व भौतिक हे असेच अनित्य असते. केवळ पुत्राचा मृत्यूच तुझ्या दु:खाला कारणीभूत आहे कां? तूं जरा मन एकाग्र करून आत्मतत्त्वाचा विचार कर व या महामोहाच्या गर्तेतून बाहेर ये."

तेंव्हा नारद म्हणाले, " राजन्! मी तुला मंत्रोपनिषदाचा उपदेश करतो त्याच्या सात दिवसांच्या जपाने तुला संकर्षणप्रभूंचे दर्शन होईल व तूं शोकमुक्त होऊन महत्पदाला प्राप्त होशील."

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८८ वे (अध्याय १६)

## चित्रकेतूंला विरक्ती व संकर्षण दर्शन

शुक मुनी पुढे सांगू लागले, " राजन्! चित्रकेतूंचा शोक नष्ट व्हावा व त्याने आपला उपदेश ग्रहण करवा म्हणून नारदांनी आपल्या योग सामर्थ्याने त्या राजपुत्राला जिवंत केले. बालक जिवंत होताच नारद त्याला म्हणाले, 'हे बालका तुझ्या मृत्यूमुळे तुझ्या माता पित्याला परम दु:ख झालेले आहे. त्यामुळे तुझे अवशिष्ट जीवन या नव्या देहधारणेने पित्याने दिलेल्या राज्याचा सुखोपभोग घेण्यात व्यतीत कर." तेंव्हा राजपुत्र म्हणाला, 'हे देवर्षी! मी कर्मयोगाने विविध योनींमध्ये भ्रमण करीत असता कोणत्या योनीतले हे माझे माता पिता आहेत? कारण तसे पहिले तर इथल्या सर्वांचेच केव्हाना केंव्हा विविध प्रकारचे संबंध येऊन गेले आहेत. परस्परांशी घडणाऱ्या व्यवहारात जसे सुवर्णादिंचे अथवा द्रव्याचे हस्तांतरण होते व जो व्यापार घडतो त्यावेळी द्रव्य देणारा व वस्तूची विक्री करणारा द्रव्य व वस्तू यांच्या विरहात तटस्थ राहून हे आपले नाही या भावनेने व्यवहार करतो. तद्वतच या जीवात्म्याच्या व्यवहारा बाबत घडत असते. जीव वेगळया वेगळया माता पित्याच्या ठिकाणी जन्म घेतो. म्हणजेच जीवात्मा हा केवळ कार्य-कारण यांचा तटस्थ साक्षी आहे. त्यामुळे सुख-दु:ख व राज्यादिक कर्मफळाचा मी स्वीकार करणार नाही!' असे सांगून तो पुन्हा निश्चेष्ट होऊन पडला.

त्या बालकाचे हे मंत्रमुग्ध करणारे भाषण ऐकून चित्रकेतूं विस्मयाने आत्मचिंतन करू लागला. त्याने विवेकाने शोकाचा त्याग केला व बालकाच्या अंत्यसंस्कारादी क्रिया केल्या. यथाविधी यमुना स्नान करून पितृतर्पण केले. मग नारदांना शरण जाऊन त्यांचा अनुग्रह घेतला. त्या नंतर चित्रकेतूंने सर्वसंग परित्याग करून एकाग्र अंत:कारणाने फक्त उदकपान करून मंत्रोपनिषदाचा जप आरंभला. त्यायोगे चित्रकेतुला विद्याधारांचे अधिपतीपद प्राप्त झाले. थोड्याच दिवसात त्या विद्येच्या सततच्या जपामुळे राजा चित्रकेतूं त्रिभुवनात संचार करू लागला. त्या सामर्थ्याने तो एकदा भगवान संकर्षणांच्या चरणी आला.

त्यांच्या दर्शनाने चित्रकेतूंचे अष्टसात्विक भाव जागे झाले. थोडावेळ त्या भावाचा अनुभव घेऊन राजा चित्रकेतूंने मन व बुद्धीचे ऐक्य साधून सर्व बाह्यवृत्तींचा निरोध केला. आणि एकाग्रतेने भगवंताची

स्तुती करू लागला. " हे भगवंता! तुला आदि-मध्य-अंत असे काहीच नाही. संपूर्ण विश्व तुला परमाणु एवढेही नाही. तरी सुद्धा आमच्या वरील दयेने प्रेरित होऊन आमच्या उद्धारासाठी श्रीमद्भागवत कथन केले आहेस. कारण याच भागवतधर्माचरणामुळे विषम बुद्धीचा नाश होतो. सनकादिकुमारांना कोणतीच आसक्ती नसून सुध्दा ते फक्त भागवताचे सेवन करीत असतात. हे भगवंता तूं मनबुद्धी अगोचर आहेस. आम्ही तुझे स्वरूप जाणू शकत नाही. तथापि तूं सहस्त्रमस्तकानी युक्त असून आपल्या मस्तकावर ब्रम्हांड धारण केले आहेस. पण ते तुझ्या मस्तकावर मोहोरीच्या दाण्या एवढेही नाही. तुला माझा निरंतर नमस्कार असो."

चित्रकेतूंची स्तुती ऐकून भगवान संकर्षण म्हणाले, " चित्रकेतूं, नारद व अंगिरामुनींच्या उपदेशाने मिळालेल्या विद्येच्या योगे आणि आजच्या माझ्या दर्शनाने तूं पूर्ण पुनीत झाला आहेस. राजन्! निद्रा व जागृती ह्या दोन्ही अवस्थांमध्ये जे ज्ञान, प्रकाशरूपाने असूनही त्याहून भिन्न रहाते ते ज्ञान म्हणजेच परब्रम्ह आहे व तेच माझे अगोचर स्वरूप आहे. परंतु ह्या मद्रूप परब्रम्हाचे जीवाला विस्मरण झाल्यामुळे त्याला जन्म मृत्युच्या फेऱ्यात अडकावे लागते. प्रवृत्तिमार्ग क्लेशकारक असूनही तो त्यातच गुंतून रहातो. व भौतिक सुखाच्या मागे लागतो. निवृत्तीमार्गाने आत्मज्ञान प्राप्त केल्यावर मुक्त होता येते हे लक्षात घेऊन मनुष्याने माझे स्वरूप असलेल्या भागवताचे दृढ श्रद्धेने अनुसंधान ठेवावे. त्या योगे नैष्कर्म्य प्राप्ती होते. तूं ही तसेच कर. म्हणजे लवकरच माझ्या स्वरूपाला प्राप्त होशील." असे आश्वासन देऊन भगवान संकर्षण अंतर्धान पावले.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ८९ वे (अध्याय १७ चालू)

## चित्रकेतूंला मृडानीचा शाप

शुकमुनी पुढे सांगू लागले , " हे राजन्! विद्याधराधीपती चित्रकेतूंने भगवान संकर्षण ज्या दिशेला अंतर्धान पावले त्या दिशेला नमस्कार केला. व आकाश मार्गाने संचार करू लागला. भागवताशी तो एकरूप झाला. त्याला संकल्प मात्रेच अनेक सिद्धी प्राप्त झाल्या. एके दिवशी भगवान श्रीविष्णुंच्या कृपाप्रसादाने प्राप्त झालेल्या विमानात बसून भगवान शिवाच्या सभेत आला. अनेक सिद्ध, अनेक ऋषी, चारण, गंधर्व इत्यादी बसलेले होते. त्या सभेत भगवान शिव मृडानीला आपल्या मांडीवर घेऊन बसले होते. इतकेच नाही तर बाहूने आलिंगन दिलेले होते. ते पाहून चित्रकेतूं उपहासगर्भ हास्याने म्हणाला, " अहो! आपण धर्मज्ञ व लोकांना उपदेश करणारे त्रैलोक्य गुरु आहात आणि भर सभेत पत्नीला मांडीवर घेऊन काय बसला आहात? तपाचरणी वेदवेत्ता जटाधारी व या सभेचा अध्यक्ष आपल्या पत्नीला मांडीवर घेऊन बसला आहे. अहो या एकांतातल्या क्रिया भर सभेत कां करता आहात?" चित्रकेतूंच्या या उपहासाने भगवान शिव जराही विचलित झाले नाहीत. पण स्वत:ला जितेंद्रिय समजणारी मृडानी मात्र चांगलीच संतापली.

भगवान शिवांच्या सामर्थ्या बद्दल चित्रकेतूं अनभिज्ञ असल्याचे समजून चित्रकेतूंला उद्देशून पण सभेकडे पहात आपल्या धारदार आवाजात उपरोधाने म्हणाली. 'सांप्रत या लोकांत आमच्या सारख्या निर्लज्यांना शिक्षण देण्यासाठी ह्याला नेमला आहे कीं काय? अहो नारद, भृगु, अंगिरा, इतकेच काय पण प्रत्यक्ष ब्रम्हदेवही भगवान शिवांच्या ह्या वागण्याचा निषेध करीत नाहीत. तिथे ह्या क्षत्रियाधम चित्रकेतूंचे औद्धत्य केवढे आहे पहा! मांगल्यालाही मंगल करणाऱ्या त्रैलोक्याधिपती जगद्‌गुरु भगवान शिवांनाच हा शिकवतो आहे! ह्या कारणामुळे हा दंडास पत्र ठरला आहे. म्हणून हे दुष्टबुद्धीच्या बालका चित्रकेतूं तूं अत्यंत पापी अशा असुर योनीत जा! म्हणजे पुन्हा सत्पुरुषांचा असा अपराध करण्यास धजणार नाहीस." मृडानीने असा शाप दिल्यावर चित्रकेतूं विमानातून खाली उतरला. व हाताची ओंजळ करून म्हणाला, ' हे देवी! माझ्या सारख्या मनुष्याचे हे प्राक्तनच आहे. ह्या धारणेने मी तुझा शाप स्वीकारला आहे. पण हे देवी अंबिके!

तूं मला पापी म्हणालीस व शाप दिलास, पण मी म्हणतो पाप तरी कसले व पुण्य तरी कसले? स्वर्ग अथवा नरक, सुख अथवा दु:ख, इत्यादी द्वन्द्वां पैकी कोणती गोष्ट सत्य आहे? सत्य फक्त एक परमेश्वर असून तो सर्व समर्थ असून हा सर्व त्याच्या मायेचा खेळ आहे. त्यामुळे तूं मला शाप दिलास असे मी मुळीच मानीत नाही. सुखाचे कर्तृत्व स्वत:कडे व दु:खाचे कर्तृत्व दुसऱ्याकडे असला मूर्खपणा मी कधीच करणार नाही. त्या भगवंताच्या मायेची लीलाच अगाध आहे. हे संतप्त पतिव्रते पापापासून मुक्त होण्यासाठी मी तुझी प्रार्थना करीत नसून माझ्या योग्य भाषणाला तूं अयोग्य ठरवीत आहेस त्याची तूं मला क्षमा कर एवढीच माझी तुला प्रार्थना आहे." असे म्हणून चित्रकेतूं विमानात बसून निघून गेला.

सर्वजण विस्मित होऊन पहातच राहिले. त्यावेळी विस्मयचकित झालेल्या मृडानीला भगवान शिव म्हणाले, " हे सुंदरी! अद्भुतलीला करणाऱ्या श्रीहरीच्या श्रेष्ठ व नि:स्पृह दासानुदासाचे माहात्म्य तूं पाहिलेस नां? हे नारायणाचे परमभक्त नित्यमुक्त व सदैव निर्भयच असतात. जे निस्पृह नसतात त्यांनाच द्वंद्वाचे भय वाटत असते. कारण त्यांची बुद्धी भेदरहित ईश्वराच्या चरणी स्थिर झालेली नसते. ते सर्वकाल भेदमय जीवनच जगत असतात. सर्वत्र समदृष्टी असलेला चित्रकेतूं त्या श्रीहरीचा अभेदभक्त आहे. त्यामुळेच तो श्रीहरिला प्रिय आहे. तसाच मलाही प्रिय आहे म्हणून तर मी त्याच्यावर कृद्ध होऊ शकलो नाही. " शुकमुनी पुढे म्हणाले , " राजन्! हाच चित्रकेतूं त्वष्ट्याने केलेल्या यज्ञात वृत्रासुराच्या रूपाने प्रकट झाला."

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ९० वे (अध्याय १७ पूर्ण)

## दितीचे व्रताचरण

शुकमुनी पुढे सांगू लागले, "राजन्! आदितीला बारा आदित्य झाले ते सगळे देवलोकी स्थानापन्न झाले. बारावा आदित्य साक्षात् भगवंताचा अवतार होता. ह्या बाराव्या वामन नामक आदित्याच्या अवताराची कथा पुढे सांगेन. दितिच्या संततीत पहिले दोन दैत्य हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष हे जन्माला आले. ते दोघेही दैत्य व दानव ह्यांना अत्यंत पूज्य होते. हिरण्यकशिपूला जाबासुर-कन्या कयाधूपासून चार पुत्र झाले. पहिला सन्ह्राद, दुसरा अनुऱ्हाद, तिसरा ऱ्हाद व चवथा प्रल्हाद. पांचवी सिंहिका नामक कन्या झाली. याच सिंहिकेला विप्रचीत्ती नामक दैत्यापासून राहू नामक पुत्र झाला. अमृत प्राशनाच्या वेळी श्रीहरीने सुदर्शनचक्राने त्याचे मस्तक धडावेगळे केले. दितीला हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष यांच्या व्यतिरिक्त मरुत् नावाचे एकुणपन्नास पुत्र झाले. त्या सर्वांना इंद्राने देव करून घेतले." हे ऐकून परीक्षित राजाला आश्चर्य वाटून त्याने हे कसे घडले असे विचारले.

तेंव्हा शुकमुनी सांगू लागले, " राजन्! इंद्रासाठी भगवान श्रीहारींनी दितीचे हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष असे दोन्ही पुत्र ठार मारले. तेंव्हा दितीने इंद्रावर सूड उगवायचा असे ठरवले. त्यासाठी आपल्यालाच समर्थ पुत्र व्हायला पाहिजे. अशा निश्चयाने तिने कश्यपांची मनोभावे सेवा सुरु केली. दिवसेंदिवस अपूर्व सेवा करणाऱ्या दितीला पाहून कश्यपांच्या मनात तिच्या बद्दल स्वाभाविक अनुकंपा निर्माण झाली. एकेदिवशी आपल्या पतीची प्रसन्नता पाहून दितीने त्यांच्या सामर्थ्याची व तपाची उचित अशी स्तुती केली. काश्यपही त्या उचित व योग्य स्तुतीने तिच्याशी प्रेमात आले. त्यांनी तिला 'तुला जे हवे असेल ते मागून घे! ' असे म्हटले. पण दिती विनयाने मुग्ध बसून राहिली. त्यामुळे अधिकच प्रेमात येऊन कश्यप म्हणाले, " भद्रे! तुझ्या सेवेने मी अत्यंत प्रसन्न झालो आहे. त्यामुळे तूं नि:संकोच कोणताही दुर्लभ वर मागितलास तरी मी तुला तो देईन. हे ऐकून दिती अत्यंत मधुर वाणीने म्हणाली, " प्रभो ! आपण जर देणारच असाल तर माझे दु:ख दूर करा! मला पुत्रशोक जाळीत आहे. ज्या इंद्रासाठी माझी दोन्ही मुले मारली गेली आहेत त्या इंद्राला मारणार पुत्र आपण मला द्या!" हे ऐकून तपस्वी कश्यपांना अत्यंत दु:ख

झाले, संतापही आला. पण त्यांनी विवेकाने मन आवरले. त्यांनी मनाशी विचार केला कीं घडल्या प्रकारात दितीचा तरी काय दोष? मीच इंद्रीयाधीन होऊन हिच्या ठिकाणी आसक्त झालो. पण आता झाले ते झाले. आपणच आता दिलेला शब्द पाळण्यासाठी आधी हिच्याकडून वैष्णवव्रत करून घ्यावे. व मग हिचा मनोरथ पूर्ण करावा. म्हणजे हिलाही अमर पुत्र प्राप्त होईल व हिच्या बुद्धीतही फरक पडेल! असा सूज्ञ विचार करून अतिशय प्रेमाने  कश्यप तिला म्हणाले, " भद्रे, तुझे कल्याण असो! तुला तुझा मनोरथ पूर्ण करण्यासाठी वर्षभर एक व्रत करावे लागेल. त्यासाठी मी जे नियम सांगतो त्यात जराही वैगुण्य राहून चालणार नाही. तरच तुला तसा पुत्र होईल."

दितीने ती अट लगेच मान्य केली. कश्यपांनी तिला नियम सांगितले, " हे कल्याणी या व्रताच्या काळात कोणत्याही जीवाची हिंसा करावयाची नाही. कोणालाही ताप द्यायचा नाही. असत्य भाषण करायचे नाही. कोणावरही रागवायचे नाही. उष्टे व अभक्ष भक्षण करायचे नाही. हात पाय धुतल्या खेरीज झोपायचे नाही. उत्तरेकडे व पश्चिमेकडे डोके करून निजू नये. हात व तोंड उष्टे ठेऊन घराबाहेर पडू नये वा निद्रा घेऊ नये. सायंकाळी निजू नये. विवस्त्र स्नान करू नये." इत्यादी बरेच निषेध सांगून झाल्यावर कश्यप म्हणाले, " हे कल्याणी आता विधीपूर्वक करावयाच्या गोष्टी ऐक! सदैव धूत वस्त्र परिधान करावे. शुचिर्भूत होऊन, सौभाग्यादी सर्व मंगल अलंकारांनी युक्त होऊन भोजनापूर्वी लक्ष्मी-नारायण, ब्राम्हण व गाय यांचे पूजन करावे. हार, गजरे, हळदी-कुंकुम, भूषणे, नैवेद्य इत्यादींसह सुवासिनीचे पूजन करावे. पतीचेही पूजन करावे. पती सदैव आपल्या सन्निध असल्याची जाणीव ठेवावी. असे एक संवत्सर पर्यंत जर तूं निष्कपट अंत:कारणाने व्रत करशील तर तुला तुझ्या संकल्पा प्रमाणे इंद्राला मारणारा पुत्र होईल." हे ऐकून दिती एकदम खुश झाली व तिने तसे व्रत करण्याचे मान्य केले. व समाधानाने कश्यपांचे वीर्य आपल्या उदरात धारण केले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-स्कंध सहावा

## पुष्प ९१ वे (अध्याय १८ व १९ पूर्ण)

## मरुद्‌गणांची उत्पत्ती

ज्ञानसंपन्न इंद्राने आपल्या मावशीचा हेतू जाणला. तो लगेच अत्यंत विनयाने मावशीकडे राहावयास आला व मावशीची सेवा करू लागला. दिती व्रतस्थ असल्यामुळे त्याला काहीच प्रतिकार करू शकत नव्हती. इंद्रही तिची अत्यंत उत्कृष्ट सेवा करू लागला. आश्रमाच्या परिसरातून रोज ताजी फुले, बिल्वदले, तुलसी, दुर्वा, दर्भ, उदक, फळे इत्यादी आणून देणे. पूजा साहित्याची सुरेख तयारी करून ठेवणे. हे सर्व करीत असताना इंद्र वाट पहात होता कीं दितीकडून सदोष वर्तन घडून आपण केंव्हा त्या गर्भाचा नाश करू शकतो. पण दितीच्या कडून तसे वर्तनच घडत नव्हते. व इंद्र काही सेवा थांबवत नव्हता.

पण दितीचे दिवस भरत आल्यावर ती जशी जशी थकून जाऊ लागली तशा इंद्राच्या आशा पालवल्या. व्रताचरण व वाढणारा गर्भ यामुळे ती कृश होऊ लागली होती. एक दिवस अशीच थकलेल्या अवस्थेत भोजन होता होताच तिला ग्लानी आली. त्यामुळे मुखमार्जन न करता व हात न धुता ती शय्येवर पहुडली व गाढ झोपी गेली. त्यामुळे इंद्राला हवी होती ती संधी प्राप्त झाली. त्याने लगेच आपल्या वज्रासह अतिसूक्ष्म रूप धारण केले व दितीच्या गर्भात प्रवेश केला. गर्भोदकात सुवर्णासारखी कांती असलेल्या बालकाचे इंद्राने सात तुकडे केले. तेंव्हा प्रत्येक तुकड्याचा एक एक देह निर्माण झाला. व ती बालके रडू लागली. तेंव्हा रडू नका म्हणत म्हणत इंद्राने प्रत्येकाचे सात सात तुकडे केले. पण त्या प्रत्येक तुकड्याचा एक एक अशी एकुणपन्नास बालके तयार झाली.

इंद्र चकित होऊन पाहत असतानाच ती बालके हात जोडून इंद्रासमोर उभी राहिली व म्हणाली, 'इंद्रा, अरे आम्ही तुझे भाऊ आहोत हे ध्यानी घे! आम्हाला मारून तुला काय मिळणार आहे? तुलाच बालहत्येचे पातक लागणार आहे. आम्ही सर्व मरुद्गण आहोत. तुला हवे ते सहाय्य करू. पण आम्हाला मारून पापाचा धनी होऊ नकोस.' हे ऐकून इंद्राला त्यांच्याबद्दल विश्वास उत्पन्न झाला व त्यांचा दैत्यत्वरूप मातृदोष दूर करून त्यांना सोमपानाचे अधिकारी करून देवांमध्ये घेतले. त्यामुळे मरुद्गण इंद्राचे प्रिय झाले.

दितीने अत्यंत मनापासून व निष्कपट होऊन व्रत केल्याचा हा परिणाम होता. एकुणपन्नास भावंडांसह इंद्र योगमार्ग अनुसरून बाहेर पडला. आणि दितीही झोपेतून जागी झाली.

इंद्रासह आपल्या एकुणपन्नास पुत्रांना पाहून तिला आनंद तर झालाच पण जास्त आश्चर्य वाटले . त्याचवेळी इंद्राला तिथे पाहून तिला क्रोधही आला नाही! उलट ती इंद्राला म्हणाली तुला भय उत्पन्न करणारा पुत्र व्हावा या उद्देशाने मी हे व्रत करीत होते. व एकाच पुत्राची मी इच्छा बाळगली असताना मला हे एकुणपन्नास पुत्र कसे झाले? हे जर तुला ज्ञात असेल तर मला खरे खरे सांग. इंद्र म्हणाला, " माते! तुझा संकल्प समजल्यावर मी कपटाने तुझे सेवकत्व पत्करले. इतके दिवस वाट पहाता पहाता आजचा दिवस उजाडला कीं तूं मुखप्रक्षालन न करता झोपलीस. या तुझ्या सदोषत्वामुळे मला तुझ्या गर्भात प्रवेश करता आला. तुला एकच पुत्र होता. पण मी त्याचे सात तुकडे करताच ते सात पुत्र झाले. त्या सातांचे सात सात तुकडे करताच ते एकुणपन्नास पुत्र झाले. हे आश्चर्य पाहून तुझ्या तपाचरणामुळे झालेली ही श्रीहरीची कृपाच आहे असे मी निश्चयाने जाणले. व स्वार्थ बुद्धीचा त्याग करून ह्या एकुणपन्नास जणांना यज्ञातल्या सोमपानाचे अधिकारी केले. ते माझे भाऊच आहेत. त्यामुळे माते तूं मला क्षमा कर. " इंद्राचे हे निष्कपट व प्रामाणिक भाषण ऐकून दितीने इंद्राला क्षमा केली व आशिर्वाद दिले. त्यानंतर इंद्र मरुद्गणांसह स्वर्गात निघून गेला.

परीक्षित राजाने कश्यपांनी कोणते व्रत सांगितले हे विचारले म्हणून शुकमुनी सांगू लागले, " राजन्! भगवान श्रीविष्णू ज्या व्रताने प्रसन्न होतात ते दीर्घकालीन व्रत म्हणजे पुंसवन व्रत आहे. हे मार्गशीर्ष प्रतिपदेस आरंभ करून कार्तिक पौर्णिमे पर्यंत करावयाचे असते. पती पत्नी दोघांनी केले तरी चालते. अथवा एकाने केले तरी चालते. रोज शुचिर्भूत होऊन भोजन काला पूर्वी संकल्प पूर्वक प्रथम मरुद्गणांची कथा श्रवण करून मग लक्ष्मी-नारायणाची षोडशोपचार पूजा करावी. वर्षभर हे व्रत करावे कार्तिक पौर्णिमेला उपवास करून दुसऱ्या दिवशी पूजन झाल्यावर यज्ञ करावा त्यात खिरीच्या बारा आहुती द्याव्यात. ब्राम्हण-सुवासिनी भोजन घालावे. त्यांना दक्षिणा द्यावी व मग त्यांच्या संमतीने व्रताची सांगता करावी. व पारणे सोडावे. असे वर्षभर करणाऱ्यांना ऐश्वर्य, आरोग्य, संपत्ती, संतती प्राप्त होऊन इप्सित मनोरथ पूर्ण होतात.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

इथे श्रीमद्भागवतातला ६वा स्कंध पूर्ण झाला. या स्कंधात एकूण १९ अध्याय व ८५१ श्लोक आहेत. त्या सर्वांचा पुष्प ८० ते पुष्प ९१ हा साररूप अनुवाद आहे.

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-सातवा स्कंध

## पुष्प ९२ वे (अध्याय १ व २ पूर्ण ३ चालू)

## जय-विजय व हिरण्यकशिपू कथा

परीक्षित राजाला एक मोठा प्रश्न पडला. त्याने शुकमुनींना विचारले, " प्रभो! परमात्मा भगवान श्रीविष्णू निर्गुण, समदृष्टी असताना व त्यांना देव, दानव, मानव यांच्या कडून काही नको असताना देवांच्या राजासाठी असुरांचा वध करण्याचे काय कारण? कारण परमात्मा विष्णू सर्व प्राण्यांचे पालन पोषण करणारा आहे! त्याला कोणाचा द्वेष नाही अथवा कोणी प्रिय नाही. कोणी शत्रू अथवा मित्र नाही."

शुकमुनी म्हणाले, " हे राजन्! भगवंत स्वत: निर्गुण, निर्विकार, निराकार असूनही स्व-क्रीडनासाठी त्याने आकार व विकार उत्पन्न केले आहेत. तो स्वत: त्या पासून अलिप्त राहिलेला आहे. त्रिगुणांच्या विषमतेतून त्रिगुणी स्वरूप उत्पन्न केले व त्या स्वरूपाला प्रकृतीचा आधार दिला. त्रिगुणाच्या विषमतेला कारणीभूत असलेला काल म्हणजेही तो स्वत:च आहे. काळामुळे गुणाधिक्य निर्माण होते. त्यामुळे संपूर्ण चराचर ईश्वरव्याप्त आहे. राजन्! शरीर उत्पन्न झाले कीं मायेच्या प्रभावाने जीव स्वत:ला ईश्वरापासून भिन्न समजू लागतो. त्यावेळी ईश्वरभक्त सत्वगुणी जीवांचा छळ होऊ लागला तर ईश्वर छळ करणाऱ्या असुरांचा नाश करतो. राजन्! पूर्वी शिशुपालाचा वध झाल्यावर त्याची प्राण ज्योत श्रीकृष्णात विलीन झालेली पाहून चकित होऊन धर्मराजांनी हाच प्रश्न नारदांना विचारला होता.

तेंव्हा नारदमुनी म्हणाले, " धर्मराजा! हा शिशुपाल व दंतवक्र हे पूर्वीचे विष्णुलोकातले जय-विजय नावाचे पार्षद आहेत. सनकादीमुनीच्या शापामुळे ते प्रथम हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष म्हणून जन्माला आले. मग रावण व कुंभकर्ण म्हणून जन्माला आले. व आता तिसऱ्या जन्मात शिशुपाल व दंतवक्र म्हणून जन्माला आले. ह्या तिन्ही जन्मातल्या भगवान श्रीविष्णुंशी धरलेल्या वैरभक्तीमुळे त्यांना सायुज्य प्राप्त झाले. हिरण्यकशिपुने भगवान श्रीविष्णुंशीच वैर धरले. व आपला पुत्र प्रल्हाद सतत त्या भगवान विष्णूंचे चिंतन व मनन करतो म्हणून त्याचा छळ करू लागला. विविध प्रकारांनी त्याला मृत्युदंड देण्याचा प्रयत्न केला पण प्रल्हादाचे रक्षण स्वत: भगवान श्रीविष्णूच करीत असल्यामुळे हिरण्यकशिपू त्याला मारू शकला नाही. हे ऐकून धर्मराजाची उत्सुकता जागृत झाली व त्यांनी प्रल्हादाचे चरित्र सांगण्याची विनंती केली. म्हणून नारद सांगू लागले, धर्मराजा! भगवान विष्णुंनी वराहावतार घेऊन हिराण्याक्षाचा वध केल्याचे वृत्त हिरण्यकशिपूला समजल्यावर तो अत्यंत संतापला. त्याने आपल्या अधिपत्याखाली असलेल्या सगळ्या

दैत्यांना आज्ञा केली कीं भगवान विष्णु हा यज्ञरूप आहे. तो आता समदृष्टी सोडून देवांचा पक्षपाती झालेला आहे. तेंव्हा त्याचे यज्ञ याग बंद पाडा. यज्ञयागाने देवांचे सामर्थ्य वाढत असते. म्हणून देवभक्त व विष्णुभक्त दिसतील तिथे ठार करा. म्हणजे देवही क्षीण होतील व विष्णुचेही सामर्थ्य क्षीण होईल. या आज्ञेमुळे त्रिभुवनात हाहाकार माजला! हविर्भाग न मिळाल्यामुळे देव स्वर्ग सोडून गुप्त रूपाने पृथ्वीवर भ्रमण करू लागले. स्वर्गातही देवांमध्ये अस्वस्थता निर्माण झाली. त्यानंतर हिरण्यकशिपुने स्वत:च अजिंक्य व अमर होऊन विश्व नियंता होण्याचा निश्चय केला व मंदारपर्वतावर तपासाठी निघून गेला. त्याच्या अनंतकाळ चाललेल्या संतप्त व उग्र तपामुळे स्वर्गातले वातावरण अधिकच अस्वस्थ होऊन हिरण्यकशीपूच्या तपाचा त्यांना दाह होऊ लागला.

त्यामुळे सगळे देव ब्रम्हदेवाकडे गेले. व प्रार्थना करू लागले. " हे देवाधिदेवा! हिरण्यकाशिपुच्या तपामुळे आम्हास स्वर्गलोकी राहणे कठीण झाले आहे. त्याच्या तपाचा संकल्प विश्व नियंत्रणाचा असल्यामुळे आम्ही संतप्त आहोत." देवांची प्रार्थना ऐकून ब्रम्हदेव त्वरित मंदार पर्वतावर हिरण्यकशीपू जिथे तप करीत होता तिथे आले. पण अनंतकाळ हालचाल न करता राहिल्यामुळे हिरण्यकशिपुच्या शरीराभोवती प्रचंड मोठे वारूळ तयार झाले होते. हिरण्यकाशीपूचा देह दिसावा म्हणून त्यांनी वारूळ अलगद बाजूला केले. तेंव्हा हिरण्यकशिपुला पाहून ब्रम्हदेव आश्चर्य चकित झाले. कारण हिरण्यकशीपूच्या देहावरील त्वचा व मांस, मेद व रक्त, इत्यादी सर्व मुंग्यांनी फस्त केले होते. हिरण्यकशिपुचा प्राण अस्थिगत झाला होता. आणि तशाच अवस्थेत तो तप करीत होता.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

पुष्प ९३ वे (अध्याय ३ व ४ पूर्ण ५ चालू)

## हिरण्यकशिपूचे तप व ब्रम्हदेवांचे वरदान

हाडांचा सापळा झालेल्या हिरण्यकशिपूला पाहून ब्रम्हदेवांच्या मनात कृपा उत्पन्न झाली. ते हिरण्यकशिपूला म्हणाले, " हे हरण्यकशिपू! तुझे कल्याण असो! तपाच्या योगाने तूं कृतार्थ झाला आहेस. मी तुला वर देण्यासाठी इथे आलो आहे. तूं अत्यंत दुष्कर तप केले आहेस. यास्तव तुझे तप निष्फळ होणार नाही." असे म्हणून ब्रम्हदेवांनी आपल्या कमंडलूतील दिव्य जलाचे त्याच्यावर प्रोक्षण केले.

त्याबरोबर हिरण्यकशिपू वज्रदेही झाला. ब्रम्हदेवांना साष्टांग नमस्कार करून व त्यांची योग्य प्रकारे स्तुती करून मग त्याने वर मागितला कीं मला तूं उत्पन्न केलेल्या कोणत्याच प्राण्यापासून मृत्यू नको. आकाशात, भूमीवर, जळात, घरात, घराबाहेर, दिवसा, रात्री, कोणत्याही शस्त्राने वा अस्त्राने, देव, दानव, पशू, यम, यमदूत, भूत, राक्षस, गंधर्व, यक्ष, किन्नर, प्रमथ, महोरग, यांच्या कडून मृत्यू नको. माझ्या इतका सामर्थ्यवान प्रतीयोध्धा कोणी असू नये. तुझ्यासारखाच माझा महिमा असावा म्हणून मी सर्व प्राण्यांचा अधिपती व्हावे. तप व योग यांच्यामुळे प्राप्त होणाऱ्या अणिमादी सिद्धी व ऐश्वर्य मला प्राप्त व्हावे असे वर मला दे.

हिरण्यकशिपुने मागितलेले सगळे वर ब्रम्हदेवांनी त्याला दिले. वर देताना ब्रम्हदेव म्हणाले, "हे दैत्यराज! अत्यंत दुर्लभ वर तूं मागत आहेस. तथापि तुझ्या तपाने मी प्रभावित होऊन तुला ते सगळे वर देत आहे." आपल्याला हवे असलेले सगळे वर मिळाल्यावर हिरण्यकशिपुने ब्रम्हदेवांचे पूजन केले. ब्रम्हदेव स्वस्थानी निघून गेले.

वर प्राप्तीने उन्मत होऊन हिरण्यकशिपू आपल्या भावाच्या वधाचे स्मरण करून भगवान विष्णूंचा द्वेष करू लागला. हिरण्यकशिपुने प्रथम संपूर्ण त्रैलोक्यावर आपले राज्य प्रस्थापित केले. परिणामी इंद्रासह सर्व देव हिरण्यकशिपुला अभिवंदन करू लागले. निष्कंटक झालेला हिरण्यकशिपू स्वत:ला प्रिय असलेल्या सर्व विषयांचा यथेच्छ उपभोग घेऊ लागला. अकुंठीत इंद्रिय शक्ती प्राप्त झालेली असल्यामुळे व स्वत:

जितेंद्रिय नसल्यामुळे सदैव अतृप्त राहू लागला. प्रकट विरोध करताच येईना म्हणून सर्व लोकपाल अंतर्यामी श्रीहरीच्या नामाचा तीव्र जप करू लागले.

सर्व लोकपाल फक्त वायूभक्षण करून प्राणपणाने हरीचा धांवा करू लागले. तेंव्हा त्यांना अव्यक्तातून श्रीहरीने परावाणीने सांगितले "हे सुरश्रेष्ठ हो ! भिऊ नका ! अजून काही काल धीर धरा! हिरण्यकशिपूचा ब्रम्हज्ञ लोकांविषयीचा द्वेष त्याच्या प्रल्हाद नावाच्या पुत्राच्या निमित्ताने पराकोटीला जाईल तेंव्हा मी हिरण्यकशिपूचा वध करीन." ह्या आकाश वाणीने सगळे देव स्थिरतेने हरीस्मरणात कालक्रमणा करू लागले.

हिरण्यकशिपूचा सगळयात लहान मुलगा प्रल्हाद हा श्रीहरीचा उपासक होता. प्रल्हाद हा शीलसंपन्न व जितेंद्रिय होता. सत्पुरुष व साधुत्वाचा उपासक होता. सदा हरिनामात मग्न असे. बालवयातच त्याला भगवान श्रीहरीची प्रीती जडली होती. हिरण्यकशिपूला असल्या कोणत्याच गोष्टींची कल्पना नव्हती व त्यातले ज्ञानही नव्हते. त्यामुळे आपल्याच मस्तीत व दिमाखात त्याने प्रल्हादाला शिक्षण देण्यासाठी शुक्राचार्यांच्या आश्रमात पाठवले. शुक्राचार्य तपासाठी गेलेले असल्यामुळे त्यांचे दोन पुत्र शंड व अमर्क दैत्यराज हिरण्यकशिपूच्या आज्ञेप्रमाणे प्रल्हादाला दंड व नीतिशास्त्र यांचे शिक्षण देऊ लागले. दुजा भाव व मिथ्या अभिमान हाच नीतिशास्त्राचा आश्रय आहे हे प्रल्हादाच्या लक्षात आले. त्याला ते आवडले नाही. पण तो काही बोलला नाही. प्रल्हादाचे शिक्षण चालू असताना एकदा हिरण्यकशिपूने मोठ्या कौतुकाने त्याला मांडीवर घेऊन " बाळा! तूं जे शिकलास त्यात तुला काय चांगले वाटते ते सांग बरे!" असे विचारले. तेंव्हा प्रल्हाद म्हणाला, " हे असुरवर्या! 'मी व माझे ' अशा मिथ्या अभिमानाने उद्विग्नता उत्पन्न होते. ती टाळण्या साठी वनात जाऊन श्रीहरी भजन करावे हे मला चांगले वाटते. " ह्यावर हिरण्यकशिपू हास्य करीत शंड व अमर्क यांना म्हणाला, " अहो! शत्रूपक्षाचे लोक गुप्त रीतीने ह्या बालकाचा बुद्धीभेद करीत आहेत. तेंव्हा चांगल्या बंदोबस्तात ह्याचे शिक्षण करा!"

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९४ वे (अध्याय ५ चालू)

## प्रल्हादाच्या वधाचे प्रयत्न

“ 'मी व माझे ' अशा मिथ्या अभिमानाने उद्विग्नता उत्पन्न होते. ती टाळण्या साठी वनात जाऊन श्रीहरी भजन करावे हे मला चांगले वाटते.” हे प्रल्हादाचे उत्तर ऐकून प्रल्हादाचे गुरु शंड व अमर्क विस्मयचकित झाले. आपल्या निवासस्थानी प्रल्हादाला आणून त्यांनी प्रेमाने प्रल्हादास 'तुला हे ज्ञान कोणी दिले? तुझा असा बुद्धीभेद कोणी केला आहे?' असे विचारले.

प्रल्हाद म्हणाला, "मला हे ज्ञान श्रीहरीने दिले आहे. स्व आणि पर ही श्रीहरीची माया आहे! त्यानेच माझा हा बुद्धीभेद केलेला आहे. माझा त्या श्रीहरिला सदैव नमस्कार आहे."

प्रल्हादाच्या ह्या उत्तराने शंड व अमर्क क्रुध्द झाले. साम-दामाचा उपयोग होत नाही असे पाहून त्यांनी प्रल्हादाला दंडाचे भय दाखवले. पण त्यांचे अज्ञान जाणून प्रल्हाद गप्प बसला. मग शंड व अमर्क यांनी प्रयत्नपूर्वक प्रल्हादाला धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थाचे शिक्षण दिले. प्रल्हाद ते निमुटपणे शिकला. त्यामुळे गुरुपुत्र शंड व अमर्क यांना प्रल्हाद शिकला असे वाटले व त्यांनी मोठ्या उमेदीने प्रल्हादाला नटवून हिरण्यकशिपूकडे आणले.

प्रल्हादाने आल्या आल्या प्रथम पित्याला वंदन केले. हिरण्यकशिपूने आशिर्वाद देऊन मोठ्या प्रेमाने त्याला आपल्या मांडीवर घेतले. कौतुकाने मस्तकावरून हात फिरवून विचारले, " बाळा! आजवर तूं जे शिकलास व तुला जे मनापासून आवडले व चांगले समजले आहे ते तूं मला सांग!" ह्यावर प्रल्हादाने उत्तर दिले , " पिताश्री! श्रवणं कीर्तनं विष्णो: स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ हे मला फारच चांगले समजले आहे. इतकेच नाही तर अशा नऊ प्रकारांनी केलेली श्रीविष्णुंची भक्ती म्हणजेच सर्व श्रेष्ठ अध्ययन आहे असे मला चांगले समजलेले आहे." असे सांगून प्रल्हाद गप्प बसला.

प्रल्हादाचे हे नि:संदिग्ध व खणखणीत उत्तर ऐकून हिरण्यकशिपू शंड व अमर्क यांच्यावर संतापून म्हणाला, " अधमांनो! हे काय मांडले आहे? अंत:करणात कपट ठेऊन आमच्या विरुध्द हे काय शिकवीत आहात?" शंड व अमर्क यांनी ह्या आरोपाचा इन्कार केला! ते म्हणाले, " हे असुरवर्या! तुझा पुत्र तुला हे जे काही सांगत आहे त्यापैकी आम्ही त्याला काहीच शिकवलेले नाही. ही त्याची उपजत बुद्धी आहे. म्हणून तूं आपला क्रोध आवर. हे ऐकून संतापाने हिरण्यकशिपूने प्रल्हादाला विचारले, " अरे अभद्रा! ह्या गुरूंनी जर तुला शिकवलेले नाही तर ही दुष्टबुद्धी तुला कुठून प्राप्त झाली?" प्रल्हाद म्हणाला, " हे तात ! हे जरी गुरुपदी असले तरी गृहसौख्य व विषयसौख्य यात रममाण झालेल्या गुरूंना अर्थ व काम ह्याचेच शिक्षण भौतिक सौख्यासाठी देण्याचे समजते. मोक्ष नामक पुरुषार्थ त्यांना समजत नसतो. त्यामुळे त्यांना श्रीविष्णुंच्या चरणी रत होण्याची बुद्धी शिकवता येणे कधीतरी शक्य आहे कां? " असे म्हणून प्रल्हाद शांत बसला.

तेंव्हा हिरण्यकशिपूने प्रल्हादाला संतापाने भूमीवर लोटून दिले आणि सेवकांना आज्ञा दिली "मारा ठार मारा या कृतघ्नाला! चुलत्याचा वध करणाऱ्या विष्णूचे दास्यत्व करणाऱ्या ह्या दुराचारीला ठार मारण्या शिवाय दुसरा उपाय नाही. हा माझा पुत्र असून माझीच या विश्व नियंत्याची अवज्ञा करीत आहे. त्यामुळे हा वध्य ठरला आहे. जा याला कोणत्याही उपायांनी ठार मारा! असुर सेवकांनी त्याच्यावर त्वेषाने त्रिशूल सोडला. पण त्या त्रिशुळाचे पाणी पाणी झाले. ते पाहून हिरण्यकशिपू चांगलाच चरकला. पण नंतर क्षणात भानावर येऊन दुसऱ्या प्रकारांनी ठार मारण्याचे प्रयत्न केले. कडेलोट, हत्तीच्या पायी देणे, अग्नीत टाकणे इत्यादी सर्व निष्फळ झाल्यावर चिंतामग्न झाला. हिरण्यकशिपूने मनोमन जाणले कीं आपलाच मृत्यू याच्या रूपाने आलेला आहे. तो विषण्ण झाला.

ते पाहून शंड व अमर्क म्हणाले, " त्रैलोक्याधिपतींना बालकामुळे मनस्ताप होण्याचे कारणच नाही. प्रल्हाद लहान आहे. त्याला अद्याप पुरेशी समज आलेली नाही. जसा जसा मोठा होईल तसा तसा तो निवळत जाईल. सध्या शुक्राचार्य तपासाठी गेले आहेत. ते आल्यावर काय करायचे ते ठरवता येईल. तो पर्यंत आपण त्याला वरुणपाशात बध्द करून ठेवू!" हिरण्यकशिपूला ते पटले! त्याने परत प्रल्हादला शंड व अमर्क यांच्या ताब्यात दिले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

॥श्रीगुरु:शरणं॥

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९५ वे (अध्याय ५ व ६ पूर्ण ७ चालू)

## प्रल्हादाचा असुर बालकांना हरिनामाचा उपदेश

शंड व अमर्क प्रल्हादाला आपल्या आश्रमात घेऊन आले. त्यांनी प्रल्हादाला वरुणपाशात बध्द करून ठेवले. प्रल्हादाला ते धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ शिकवू लागले.

प्रल्हादाला ते अजिबात रुचेना. त्यातल्या द्वान्द्वाने येणारी उद्विग्नता टाळण्यासाठी तो सतत हरीनाम घेत असे. इतकेच नाही तर त्याचे गुरु प्रापंचिक व्यवसायासाठी बाहेर गेले कीं इतर समवयस्क मुले कुतुहलाने प्रल्हादाभोवती जमत. तेंव्हा प्रल्हाद त्यांनाही हरीनामाची गोडी लावून हरिनामात गुंगवून टाकीत असे. प्रल्हादाच्या प्रामाणिक व मधुर बोलण्याने तेही नि:संकोच हरिनामात दंग होऊन जात.

प्रल्हाद आपल्या बरोबरीच्या मुलांना सांगत असे "मित्रांनो! भगवान श्रीहरी एकटाच सर्व विश्वाला व्यापून उरलेला आहे. त्याच्या निर्गुण व निराकारत्वा मुळे तो आपल्याला दिसत नाही. तरी तो एकच सर्व सुखाचा सागर आहे. व प्राप्त होण्यासही अगदी सुलभ आहे. आपले शरीर अगदी अलीकडे निर्माण झालेले व अनित्य आहे. ईश्वर त्या आधीपासून व निरंतर आहे. विचार करा मित्रांनो आपल्याला ज्या विद्या शिकवल्या जातात त्यांच्या अभ्यासा नंतर आपल्याला प्राप्त काय होणार? तर संसार सौख्य! पण आपले गुरु तरी निरंतर सुखात असल्याचे आढळतात काय? निरंतर सुख म्हणजे समाधानाचे सातत्य! ते फक्त श्रीहरी जवळच असते. संसारातून प्राप्त होणारी सुखे सदैव बदलत असतात व ती क्षणिक असतात. सतत नवीन नवीन सुखे आपल्याला शोधावी लागतात. श्रीहरीचे तसे नाही. श्रीहरी जवळ निरंतर सुख आहे. त्याचे वैशिष्ट्य असे आहे कीं प्रयत्न पूर्वक मनातले विषयभोग हरी नामाने काढून टाकले कीं मग ते हाती येते. एकदा हाती आले कीं अक्षय राहते. केंव्हाही अनुभवता येते. कोणत्याही अवस्थेत ते अमृतमयच वाटते. त्याचा कधीच वीट येत नाही. शिवाय पुन्हा पुन्हा कष्टही करावे लागत नाहीत. अथवा काही खर्चही होत नाही. सर्व इंद्रियांची समप्रमाणात तृप्ती होत असल्याने अंत:करण समाधानाने भरून जाते. असे हे अद्वितीय आत्मविद्येचे ज्ञान आहे. मला ते नारदांकडून मिळाले आहे."

तेंव्हा प्रल्हादाचे असुर मित्र म्हणाले, " गड्या प्रल्हादा! तूं फारच मधुर व गोड बोलतोस. पण आम्ही तुला लहानपणा पासून इथेच पहात आहोत. नारदांना इथे आल्याचे व तुला काही सांगितल्याचे आम्ही कधीच काही पाहिलेले नाही. तेंव्हा नारदांनी कधी सांगितले? हा आमचा संशय दूर कर!"

हे ऐकून प्रल्हादास आनंदच झाला. आपल्या गुरूंचे म्हणजे नारदांचे स्मरण करून तो सांगू लागला. " हे दैत्य पुत्र हो ! माझा जन्म होण्यापूर्वी माझा पिता तपाचरणास निघून गेला. हे पाहून इंद्राने असुरांबरोबर युद्ध करण्याचा मोठाच उद्योग सुरु केला. तो असुरांचा नाश करू लागला. त्यावेळी आमचा राजप्रासादही त्यांनी लुटला. तेंव्हा मी उदरात असलेल्या माझ्या मातेला इंद्राने पकडले. तिला पळवून नेत असताना ती जीवाच्या आकांताने भगवंताचा धांवा करू लागली. तेंव्हा नारद तिथे प्रकट झाले. त्यांनी इंद्राची समजूत घालून माझ्या मातेला त्यांच्या आश्रमात नेले. त्यावेळी तिने नारादांची खूप सेवा केली. नारद प्रसन्न झाले तेंव्हा तिने प्रार्थना करून माझ्या पित्याचे तप संपे पर्यंत व त्या नंतरही इच्छित वेळी प्रसूत होण्याचा वर मागितला. त्यावेळी माझ्यावर कृपा करण्यासाठीच नारदांनी तिला ह्या आत्मज्ञानाचा उपदेश दिला. कालांतराने माझ्या पित्याच्या सहवासात तिला जरी त्याची विस्मृती झाली असली तरी मला मात्र श्रीगुरूकृपेने विस्मृती झालेली नाही. केवळ श्रीगुरुंवरील श्रद्धेमुळे मी हरिनाम घेत राहिलो व मग मला ही अहंकाराच्या नाशाची विद्या प्राप्त झाली आहे. तशीच ती कोणालाही प्राप्त होऊ शकते.

मित्रहो! विचार करा! आज ज्या अवस्थेत आहोत ती अवस्था काही कायमची नाही. देहाच्या अवस्था सतत बदलत असतात. पण आत्म्याचा म्हणजेच परमात्म्याचा विचार कराल तर तो नित्य आहे. न बदलणारा आहे. आपल्या हृदयात वास करणारा आहे. त्या आत्मतत्त्वाची म्हणजेच श्रीहरीची उपासना करा. ती उपासना म्हणजे नामस्मरण.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९६ वे (अध्याय ७ पूर्ण ८ चालू)

## भगवान श्रीनृसिंह अवतार व हिरण्यकशिपूचा वध

प्रल्हादाच्या निष्कपट व सत्य भाषणाने मंत्रमुग्ध झालेल्या असुरपुत्रांना अनंद झाला. ते मोठ्याच उत्सुकतेने व भाव विभोर होऊन ऐकू लागले. प्रल्हाद सांगू लागला, मित्रांनो, नामस्मरणाने भगवंताचा म्हणजेच श्रीहरीचा सूक्ष्म सहवास होतो. भगवान श्रीहरीच्या ठिकाणी प्रेम उत्पन्न होणे आवश्यक आहे. त्यासाठी अनेक साधने मला नारदांनी सांगितली आहेत. त्यातली काही महत्वाची अशी, निष्कपट व्यवहार करणे, स्वत:ला मोठे समजून न वागणे, काम, क्रोध, बळ, दर्प, हाव इत्यादीवर नामस्मरणाने संयम आणणे. त्यासाठी भगवद्कथा श्रद्धेने श्रवण करणे. त्यातल्या भावाशी समरस होऊनच श्रीहरीची प्रीती निर्माण होऊ शकते. त्यासाठी ध्यान धरण्याची संवय करणे. श्रीहरीच्या सगुण स्वरूपाचे कीर्तन, पूजन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, करावे. आपले काहीच नसल्याची जाणीव ठेवावी. शरीरात आपले काय आहे? आपल्याला आपले शरीर इथेच टाकून जावे लागते. त्याची जाणीव ठेवून श्रीहरीचा विरह निर्माण करून घ्यावा. मनात सतत त्याचा सहवास घोळवत राहावा. व कल्पनेने त्याचा विरह उत्पन्न करून घेऊन भावविवश व्हावे. त्या भावविवशतेने अंगावर रोमांच उभे राहिले पाहिजेत. थोडक्यात म्हणजे अष्टसात्विक भाव जागे करायचे.

मित्रांनो! मग श्रीहरीच्या लीलारूप चिंतनाने तन्मयता साधून केलेल्या साधनेने इहातल्या संसार-चक्राचा नाश होतो. कसा तो ज्याचा त्याने अनुभवायचा असतो. कारण जागृती, स्वप्न, सुषुप्ती अशा बुद्धीच्या तीन अवस्था असतात. त्याचा अनुभव आपण नित्य घेतोच. पण ज्याच्या योगाने हा अनुभव येतो तो अवस्थात्रयाचा साक्षी भगवान श्रीहरीच असतो हे लक्षात घ्या. म्हणून बुद्धीच्या अवस्थात्रयांचा नाश म्हणजेच संसारचक्राचा म्हणजेच भेदबुद्धीचा नाश. पण त्यासाठी भक्तीयोगच उपयोगी पडतो. त्याच भक्तीयोगाने कधीच नाश न पावणारे सुख समाधान संसारात राहूनही मिळणार असेल तर ते कां बरे अनुभवायचे नाही? त्यामुळे आपल्याच हृदयात वास करणाऱ्या श्रीहरीची प्रेमाने नामस्मरण उपासना करण्यात कोणता मोठा प्रयास आहे? निरपेक्ष, सर्वसमर्थ व दु:ख हर्त्या श्रीहरीचे निष्काम भजनामुळे हे सर्व

सहज प्राप्त होते. जो कोणी "आपल्या प्रमाणे सर्वांनाच सुख-दु:ख असते" अशी धारणा ठेवून श्रीहरीचे निष्काम भजन करतो त्याला सर्वच पुरुषार्थ प्राप्त होतात. " प्रल्हादाच्या स्वानुभूति असलेल्या बोलण्यामुळे सगळया असुरमित्रांना त्याचे म्हणणे पटले. त्यांनी प्रल्हादाच्या मार्गदर्शनाने बुद्धी अंतर्निष्ठ केली.

आपले सर्व असुरविद्यार्थी प्रल्हादाच्या नादी लागल्याचे शंड व अमर्क यांच्या लक्षात आले. त्यांनी लगेच प्रल्हादाला हिरण्यकशिपू समोर उभा करून हिरण्यकशिपूच्या कानावर सर्व सविस्तर वृत्त घातले. हिरण्यकशिपू संतापला. त्याने प्रल्हादाकडे एक जळजळीत कटाक्ष टाकला. प्रल्हाद विनम्रतेने पण निर्भयतेने हात जोडून उभा असलेला पाहून हिरण्यकशिपूला त्याचा तिरस्कारही वाटेना! हिरण्यकशिपू प्रल्हादाला क्रोधाने म्हणाला, "अरे अधमा! जिथे सर्व लोकपालही मझ्या नजरेच्या धाकाने चळचळा कापतात तिथे तूं कोणाच्या बळावर निर्भय होऊन माझी अवज्ञा करीत आहेस?" प्रल्हाद शांतपणे म्हणाला, " हे तात! मी ज्याच्या बळावर निर्भय आहे ते बळ स्थावरजंगमासह विश्वव्यापी भगवान श्रीविष्णूंचे आहे. तोच भगवान श्रीहरी कालरूपाने प्रत्येकाचे आयुष्य क्षीण करीत असतो. मनाची समता हे त्या श्रीहरी पूजनाचे साधन आहे. मन व बुद्धीसह देहाभिमान श्रीहरीस अर्पण केल्यावर द्वंद्व रूप शत्रुत्वच उरत नाही मग भय कसले असणार? तात, आपण इंद्रियरुपी षड्रिपुंना न जिंकता त्रैलोक्य जिंकले असे कसे म्हणता? आणि जर तसे असेल तर मग तुम्हाला भय कसले? "

प्रल्हादाच्या ह्या उत्तराने हिरण्यकशिपू संतापून म्हणाला, " अरे अधमा! सर्व विश्वाचा नियंता मी स्वत:च असताना तूं हा विश्वव्यापी श्रीहरी काल रूपाने नियंता असल्याचे मूर्खा सारखे बरळतो आहेस तर दाखव कुठे आहे तुझा हा विश्वव्यापी श्रीहरी? बोल! ह्या खांबात आहे कां? त्याच्याच साक्षीने मी स्वत:च तुझे शीर धडा वेगळे करतो!" असे म्हणून हिरण्यकशिपू आपली तलवार घेऊन खाम्बाकडे धावला. आपल्या वज्र मुष्टीने प्रथम त्या खांबाची शकले केली.

इतक्यात त्या खांबातून प्रचंड मोठा अट्टहास्याचा ध्वनी आला. त्या ध्वनीची कंपने इतकी तीव्र होती कीं हिरण्यकशिपू थरथर कांपू लागला! त्याची सगळी सेना भुईसपाट झाली. हिरण्यकशिपू खांबाकडे पहात असतानाच त्यातून भगवान नरसिंह प्रकट झाले. प्रल्हादाने त्यांना प्रथम नमस्कार केला. नरसिंहाचे ते प्रचंड मोठे उग्र रूप पाहून हिरण्यकशिपू प्रथमदर्शनी भेदरला. पण लगेच सावरून आपली गदा घेऊन धावला! तेंव्हा नरसिंहांनी जे अट्टहास्य केले त्याने संपूर्ण विश्व थरारले. त्यामुळे ब्रम्हदेवांसह सर्व लोकपाल, भगवान शिव, ऋषी इत्यादी ती घटना पहाण्यासाठी तिथे प्रकट झाले. त्या सर्वांच्या समोरच भगवान नरसिंहांनी हिरण्यकशिपूला मानेला पकडून उचलले. आपल्या अनेक हातांपैकी काही हातांनी हिरण्यकशिपूला नि:शस्त्र केले. राजप्रासादाच्या उंबऱ्यात बसून मांडीवर घेऊन वेत चिरावा तसे त्याचे पोट आपल्या नखांनी विदारण करून त्याला ठार केले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९७ वे (अध्याय ८ व ९ पूर्ण)

## प्रल्हादकृत नरसिंह स्तुति

भगवान नरसिंह जेंव्हा हिरण्यकशिपूला घेऊन उंबऱ्यात बसले तेंव्हा ते म्हणाले, तुला घरात व घराबाहेर मरण नको म्हणून मी उंबऱ्यात बसलोय, तुला दिवसा वा रात्री मरण नको म्हणून सायंकाळ निवडली, शस्त्र नको अस्त्र नको म्हणून नखांनी तुझे पोट विदारण करीन, ब्रम्हदेवाने निर्माण केल्या पैकी मी नाही, तुझ्या सगळया वरांची पूर्तता करून मूर्खा मी तुला ठार मारतो असे म्हणून भगवान नरसिंहांनी त्याचे पोट विदारण करून त्याला ठार केले. त्याची आतडी हारा सारखी गळयात घातली. त्यामुळे मुळच्या उग्र रुपात अधिकच भर पडली. भगवान नरसिंह तिथून उठून सिंहासनाकडे जाऊ लागले तेंव्हा त्यांच्या उग्र व संतप्त चेहऱ्याकडे पहाण्याचे धैर्य ब्रम्हदेवांनाही होईना! प्रल्हाद मात्र निर्भयपणे सर्व पहात होता. भगवान नरसिंह सिंहासनावर बसले.

त्रैलोक्याला ताप देणारा दैत्यश्रेष्ठ हिरण्यकशिपू मारला गेल्याचा आनंद सर्वांनाच झाला. पण भगवान नरसिंहांच्या उग्ररुपाला घाबरून त्यांच्या समोर येऊन त्यांची स्तुती करण्याचे धैर्य कोणाच्याच अंगी नव्हते. ब्रम्हदेवांनी प्रथम लक्ष्मीला पाठवण्याचा प्रयत्न केला पण भगवान नृसिंहाचा क्रोध पाहून तीही पुढे जाण्यास धजावली नाही. जेंव्हा भगवान नरसिंहांचे पार्षद हळूच त्यांच्या समीप आले, अप्सरांनी आकाशातून पुष्पवृष्टी केली, गंधर्व विजयगीते गाऊ लागले तेंव्हा इतर देवांना धीर आला. पण ते आपल्या जागेवरून म्हणजे दुरूनच स्तुती करू लागले. प्रथम ब्रम्हदेवांनी उचित स्तुती केली. मग शिवांनी स्तुती केली. इंद्र, ऋषी, पितर, सिद्ध, विद्याधर,सुनंद, कुमुद, इत्यादी सर्वांनी स्तुती केली पण भगवान नरसिंहांचा उग्र चेहरा समाधानाने शांत झालेला दिसेना. हे पाहून ब्रम्हदेव आपल्या जवळ उभ्या असलेल्या प्रल्हादाला म्हणाले, " प्रल्हादा! तुझ्या साठी अवतीर्ण झालेल्या परमात्म्याला तूंच शांत कर!" प्रल्हाद निर्भयपणे भगवान नृसिंहांच्या समीप आला. त्याने भगवान नृसिंहांच्या चरणावर मस्तक ठेवले. प्रल्हादाच्या या कृतीमुळे भगवान नृसिंहांचा राग लगेच शांत झाला. प्रल्हादाचे अष्टसात्विक भाव जागे झाले.

अंत:करणातून प्रल्हाद अभेदभक्तीने चांगलच व्याकुळ झालेला भगवंताने जाणला. भगवान नृसिंहांनी प्रल्हादास आपल्या हातांनी उचलून उभे केले. त्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवला. त्यावेळी अभेदभक्तीने ईश्वर भेटी साठी व्याकूळ झालेल्या प्रल्हादाच्या अंत:करणात आत्मानंदाच्या ज्ञान लहरी खेळू लागल्या. वेगळे राहूनही एकरूपतेचा अनुभव त्याने घेतला. त्याच अनुभूतीत त्याने भगवान नृसिंहांच्या चेहऱ्यावर आपली दृष्टी स्थिर केली व स्तुति करू लागला, " शुध्द सत्वगुणी ब्रम्हदेवादीक देवगणांची विपुल ज्ञानयुक्त स्तुतिस्तवनेही तुला प्रसन्न करू शकली नाहीत. तिथे माझ्या सारख्या असुरयोनीत जन्मलेल्या बालकाच्या स्तवनाचे सामर्थ्य ते काय असणार? हे प्रभो! तूं स्वत:परिपूर्ण असून निरपेक्ष आहेस. फक्त भाव व भक्ती ह्यांच्याच प्रभावाने तूं प्रसन्न होतोस. म्हणून मी जरी असुर कुलोत्पन्न निकृष्ट असलो तरी नि:शंक मनाने भाव, भक्ती, श्रद्धा व प्रेम यांनी तुझे स्तवन करणार आहे. प्रभो! हे ब्रम्हादिक देव तुझ्या आज्ञांचे श्रद्धापूर्वक भक्तीने पालन करतात. आम्हा असुरांसारखे वैरभावाने करीत नाहीत. आणि विश्वकल्याण व आत्मानंद यांच्या लाभासाठी आपल्या मनोहर अवतारांनी तूं नाना लीला करीत असतोस. कोणाला भय उत्पन्न करण्यासाठी नक्कीच करीत नाहीस. यास्तव हे प्रभो आपण शांत व्हा! उपद्रवी दैत्यश्रेष्ठ तर आपण मारलाच आहे. त्याचा आनंद सर्वांनाच झाला आहे. आता सर्व जण आपल्या क्रोधाच्या उपशमाची याचना करीत आहेत.

हे प्रभो! अतिभयानक व विक्राळ मुखातून निघालेली लळलळणारी ती जिव्हां, त्या कराल दाढा, संतप्त व आग ओकणारे खदिरांगारा सारखे तेजस्वी डोळे, गळयात अडकवलेली ती आतड्यांची माळ, शत्रूचे विदारण करणारी ती अणकुचीदार नखे यापैकी मला कशाचेही भय वाटत नाही. पण याही पेक्षा भयानक असलेल्या संसार तापाला मी घाबरून गेलो आहे. त्यामुळे संसार भया पासून मुक्त होण्यासाठी तुझ्या पवित्र चरणी आसरा कधी मिळतो याची वाट पहात आहे. हे प्रभो! प्रिय वस्तूच्या वियोगाने व अप्रिय वस्तूच्या संयोगाने आमच्यात सुख-दु:ख व आनंद-शोक उत्पन्न होतो. ते सर्व शरीरासह क्षणिक व नश्वर आहे. हे समजूनही देहाभिमानामुळे मोह उत्पन्न होतोच. गृहस्थाश्रमी पुरुषाला अनेक भार्या असाव्यात आणि त्यांनी त्या पुरुषाची क्षणिक सौख्यासाठी खेचाखेच करावी तशी हे विषय देहेन्द्रीयांची खेचाखेच करीत असतात. आणि दु:खाची मालिकाच सुरु होते. यास्तव मला शाश्वत सुखाचा म्हणजेच अविनाशी ज्ञानाचा उपदेश करून आपल्या चरणी आसरा दे! कारण माता पित्यांचे संरक्षण मर्यादित काळच असू शकते. पण काळाच्या अतीत असलेला तूंच खरा संरक्षणकर्ता असतोस हे आम्ही जाणत नसतो." प्रल्हादाची ही प्रार्थना ऐकून भगवान नृसिंह त्याच्यावर प्रसन्न झाले. त्यांचा सगळा राग मावळला! चेहरा प्रसन्न झाला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९८ वे (अध्याय १० पूर्ण)

## प्रल्हादास राज्याभिषेक व त्रिपुरदहनाची कथा

भगवान नृसिंह प्रल्हादाच्या प्रार्थनेने प्रसन्न झाले. त्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्नता पसरली. भगवान नृसिंह प्रल्हादाला म्हणाले, " हे कल्याणा! माझे दर्शन ज्याला होते तो शोक व भय यापासून मुक्त होतो. हे असुरश्रेष्ठा मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. त्यामुळे तुला हवा तो वर तूं मागून घे!"

वर मागणे म्हणजे भक्तियोगात विघ्न उत्पन्न होणे! हे जाणून प्रल्हाद म्हणाला, " हे प्रभो! विषयसंगाच्या भयाने विरक्त होऊन मी आपणास शरण आलो आहे. त्यामुळे वर मागून भक्तीचा व्यापार करण्याचे माझ्या मनातही येऊ शकत नाही. माझा 'स्वामी व सेवक' भाव निष्काम आहे तो तसाच राहावा असे मला वाटते. त्यामुळे तसाच वर मला दे! कारण कामांकुरांच्या उत्पत्तीमुळेच तर इंद्रिये, मन, प्राण, देह, धर्म, धैर्य, आत्मानात्म विवेक, लज्जा, ऐश्वर्य, प्रताप, स्मृती, व सत्य यांचा नाश होतो. म्हणून मला त्यातील काहीच नको. माझा तुला नमस्कार असो."

प्रल्हादाची ही प्रार्थना ऐकून अत्यंत प्रसन्नतेने हसून भगवान नृसिंह म्हणाले, " प्रल्हादा! तूं अगदी उत्तम वर मागितला आहेस. तथापि हे मन्वंतर संपे पर्यंत तूं दैत्यांचा राजा हो! सर्व कर्मे मला अर्पण करण्याचा तुझा स्थायीभाव झालेला असल्यामुळे तूं कर्मबंधनात अडकणार नाहीस व विषयभोगाने पुण्यक्षय होत राहील. माझ्या नामस्मरणामुळे पापक्षय होत राहील. इतकेच नाही तर तूं गेलेल्या स्तोत्राने माझे स्तवन करणारही कर्मबंधातून मुक्त होईल. बाळ प्रल्हादा! तूं ब्रम्हवेत्यांच्या वचनाला अनुसरून माझ्या ठिकाणी मन ठेवून पित्याच्या स्थानावर आरूढ हो!" प्रल्हादावर प्रसन्न होऊन सौम्य वदन झालेल्या भगवान श्रीनृसिंहांना पाहून ब्रम्हदेवांना धीर आला. ते पुढे होऊन प्रार्थना करू लागले, " हे देवाधिदेवा! माझ्याकडून प्राप्त झालेल्या वरामुळे व तप आणि योग यांच्या प्रभावाने बलवान होऊन वेदप्रणीत धर्म नष्ट करणाऱ्या उन्मत्त हिरण्यकशिपूला तूं ठार केलेस हे फार चांगले झाले. तुझ्या स्वरूपाचे ध्यान मनुष्याचे सर्व भयांपासून रक्षण करणारे आहे."

ब्रम्हदेवांनी केलेली प्रार्थना भगवान नृसिंहांनी मान्य केली व म्हणाले, " ब्रम्हदेवा! यापुढे अशा क्रूर स्वभावाच्या असुरांना असा वर कधीही देऊ नकोस! " इतके सांगून ब्रम्हदेवांनी केलेली पूजा स्वीकारून भगवान नृसिंह अंतर्धान पावले.

नारद मुनी पुढे म्हणाले, " हे धर्मराजा! त्यानंतर प्रल्हादाने आपल्या पित्याचे और्ध्वदेहिक केले व भगवान नृसिंहांच्या आज्ञेप्रमाणे राज्य ग्रहण केले." ही सगळी गोष्ट सांगून नारद धर्मराजांना म्हणाले, "धर्मराजा! याप्रमाणे जय-विजय हे भगवान श्रीविष्णूंचे पार्षद ह्या जन्मातून सुटले. आणि रावण व कुंभकर्ण म्हणून अवतरले, त्यावेळी भगवंताने श्रीरामाच्या अवतारात त्यांचा वध केला. त्यानंतर शिशुपाल व दंतवक्र या नावांनी तिसऱ्या जन्मात आले. याही जन्मात श्रीहरीशी निरंतर वैर भाव धरून श्रीहरीच्या ध्यानात राहिले त्यामुळे सर्व पापातून मुक्त होऊन श्रीहारीलाच जाऊन मिळाले. हे तूं प्रत्यक्षच पाहिले आहेस. त्यामुळे श्रीहरीच्या सगळयाच लीला अगाध आहेत. भगवान शिवांनी वर दिलेल्या मयासुराने जेंव्हा उत्पात मांडला तेंव्हा तो उत्पात सुध्धा भगवंतांनी स्वत:च नष्ट केला." हे ऐकून धर्मराजांनी मयासुराची कथा श्रवण करण्याची इच्छा व्यक्त केली म्हणून नारद सांगू लागले, " भगवान शिवांनी दिलेल्या वरामुळे मयासुर मायाकलेत निपुण झाला. देवांकडून वारंवार पराभूत झालेल्या असुरांनी मयासुराचा आश्रय घेतला. मयासुराने असुरांना विजय प्राप्त व्हावा म्हणून एक सुवर्णाचे, एक रुप्याचे व एक लोहाचे अशी तीन पुरे युध्द सामग्रीसह निर्माण करून दिली. त्या पुराचे चलन-वलनादी व्यवहार अनाकलनीय असत. त्यामुळे असुरांचा सेनापती कोणासही न दिसता त्रैलोक्याचा नाश करण्यास प्रवृत्त झाला. तेंव्हा इंद्रादी लोकपाल भगवान श्रीशिवशंकरांना शरण गेले. मयासुराने स्वत:च एक अमृत विहीर उत्पन्न केली व असुरांना अमृतपानाने वज्रदेही करून युध्द्धाला पाठवू लागला.

त्यामुळे हतबल झालेल्या शिवांनी भगवान श्री विष्णूंचा धावा केला. भगवान श्रीविष्णुंनी त्वरित सगळे जाणून गाईचे रूप घेतले, आपल्या बरोबर वासरू म्हणून ब्रम्हदेवांना घेतले. जल शोधीत विहिरी जवळ यावे तसे माध्यान्ह काळी मयासुराच्या अमृताच्या विहिरीवर येऊन सर्व अमृत पिऊन टाकले. गाय आणि वासरू समजून रक्षकांनी त्याना प्रतिबंध केला नाही. अमृत संपल्यावर ते शोकग्रस्त होऊन मयासुराकडे आले. तेंव्हा मयासुर शांतपणे इतकेच म्हणाला, "भगवंताच्या मायेपुढे कोणाचेच सामर्थ्य चालू शकणार नाही. त्याची माया अतर्क्य आहे." त्याचवेळी भगवान श्रीविष्णुंनी भगवान शिवांना धर्म, ज्ञान, वैराग्य, तप, विद्या आणि आपली कृपा इत्यादी शक्तींच्या सहाय्याने रथ, सारथी, ध्वज, अश्व, धनुष्य, बाण, कवच इत्यादी युद्ध सामग्री सज्ज करून दिली. त्यावेळी भगवंताच्या प्रेरणेने भगवान शिवांनी माध्यान्हकाली अभिजित नक्षत्राच्या मुहूर्तावर एका रेषेत आलेल्या त्या त्रिपुरांना फक्त एकाच बाणाने दग्ध केले. अशी ही भगवंताची लीला आहे.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प ९९ वे (अध्याय ११,१२,१३ पूर्ण)

## धर्म निरुपण

शुक मुनी पुढे सांगू लागले, " राजन्! नारदांच्या रसाळ वाणीने धर्मराजांची तृप्ती होईना! ते नारदांना म्हणाले, हे प्रभो मला सर्वोत्कृष्ट सनातन धर्माचे रहस्य आपल्याकडून जाणून घेण्याची इच्छा आहे."

देवर्षी नारद आनंदाने सांगू लागले, " हे धर्मराजा! जन्मादि विकारशून्य भगवंताला नमस्कार करून साक्षात् नारायणांच्या मुखातून श्रवण केलेला सनातन धर्म मी तुला कथन करतो. सर्वदेवतारूप अशा श्रीहरीवर नितांत श्रद्धा, तज्ज्ञांची स्मृती व मन संतुष्ट करणारे सदाचरण ही धर्माची मुख्य प्रमाणे आहेत. सत्य, तप, दया व पावित्र्य हे धर्माचे चार चरण आहेत. त्यांच्या सहाय्याने श्रुती-स्मृती यांनी केलेले नियम हे इह व पर कल्याण साधणारे शास्त्र मानले जाते. त्यात मुख्य गोष्टींचा खास उल्लेख असा आहे कीं दैनंदिन जीवनात मनुष्याने तितिक्षा म्हणजे सहनशीलता, ईक्षा म्हणजे सारासार विचार, शम म्हणजे मन:संयम, दम म्हणजे इंद्रिय निग्रह, अहिंसा म्हणजे अकारण जीव हिंसा न करणे व स्वार्थबुद्धीने इतरांची मने न दुखावणे, ब्रम्हचर्य, त्याग म्हणजे दानशूरता, स्वाध्याय म्हणजे उचित मंत्रांचा जप वगैरे, आर्जव म्हणजे मनाची सरलता, संतोष, संतसेवा, कर्म-मार्ग न सोडता अंत:करणातून फलापेक्षेचा त्याग (म्हणजेच नैष्कर्म्य), सामुहिक सहजीवनात निरपेक्ष काम करण्याची वृत्ती, अतत्त्वार्थ भाषणी मौन, आत्मानात्मविवेक जागृती, इतर जीवांविषयी आत्मदेवता बुद्धी, भगवत्चरित्र श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन या लक्षणांनी युक्त असलेला हा सनातन धर्म अत्यंत श्रेष्ठ आहे. त्याच्या आचरणाने सर्व जीवांचे कल्याण होते. जीवाला जन्म मिळाल्यावर त्याच्यावर षोडश संस्कार करावेत. व वर उल्लेखलेल्या तत्त्वांवर आधारित शिक्षण देऊन त्याला आदर्श बनवावे. त्यासाठी चार प्रकारच्या आश्रमीय जीवनाची संकल्पना शास्त्रात सांगितली आहे. १. विद्यार्थी दशेत शिक्षण पूर्ण होई पर्यंत

ब्रम्हचर्याश्रम, २. शिक्षण पूर्ण झाल्यावर विवाह केल्यावर गृहस्थाश्रम, ३. गृहस्थाश्रमा नंतर वानप्रस्थाश्रम व चौथा संन्यासाश्रम. वानप्रस्थासाश्रम आचरण्यास असमर्थ असल्यास फक्त देहधारणे इतके मिताहारी होऊन संसारातून लक्ष काढून हरीचिंतन करण्यात व सर्वांचे हितचिंतन करण्यात काल घालवावा. संन्यासाश्रम हा व्यावहारिक धर्माचरणासाठी नसून आत्मस्वरूपाकडे लक्ष लावण्यासाठी असल्यामुळे धर्मराजा मी तुला पूर्वी प्रल्हाद व अवधूत यांचा जो उद्बोधक संवाद झाला तो संवाद सांगतो. त्यातून तूं योग्य तो बोध घे. एकदा प्रल्हाद अमात्यांसह सह्यपर्वतावर संचार करीत असताना कावेरी नदीच्या तीरी त्याला एक धुळीने माखलेले व भूमीवर शयन केलेले ऋषी दिसले. त्यांचे पूजन करून प्रल्हादाने त्यांना विचारले, ' हे मुने! आपण भोगरहित व अकिंचनअवस्थेत जीवन जगत असूनही आपला देह गृहस्थाश्रमी सारखा पुष्ट कसा?' ते मुनी म्हणाले, ' राजन्! विषयभोगाने कधीच तृप्ती होत नसल्याच्या माझ्या पूर्वीच्या सकामकर्माच्या अनुभवाने मी निष्काम झालो व कर्मत्याग केला. मग आत्मस्वरूपाचा पुरुषार्थ ध्यानी घेऊन मी मधुमक्षिका व अजगर यांना आपले गुरु केले. मधुमक्षिका मध गोळा करते व दुसराच कोणी त्याचा उपभोग घेतो. तसेच आपल्या धनाचे होते. हे मी मधुमक्षिके पासून शिकलो. काही एक खटपट न करता दैववशात जे प्राप्त होईल त्याच्या योगाने संतुष्ट राहावे हे मी अजगरापासून शिकलो. त्यामुळे दैववशात प्राप्त होणारे कसेही अन्न मी स्वीकारतो. स्वेच्छेने दगडावर झोपतो किंवा परेच्छेने गाद्यागिरद्यांवर झोपतो. कधी न मिळाले तर मी विवस्त्रही असतो. भेदरूप मनोवृत्तीचा त्याग करून स्वस्वरूपी स्थित झाल्यामुळे, हे प्रल्हादा! समजण्यास अत्यंत कठीण व आचरणात आणण्यास त्याहून कठीण असा हा लोकशास्त्र विरुध्द असलेला गुह्य संन्यासाश्रमातला परमहंसधर्म तुला थोडक्यात सांगितला आहे. कारण तूं भगवन्निष्ठ व परमहंसधर्म जाणण्यास योग्य आहेस!' तेंव्हा धर्मराजा! असा हा संन्यासाश्रम आहे.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- सातवा स्कंध

## पुष्प १०० वे (अध्याय १४ व १५ पूर्ण)

## गृहस्थाचे सदाचार व मोक्ष धर्म

युधिष्ठिरांनी विचारमग्न होऊन प्रश्न केला, " प्रभो! गृहस्थाश्रमी मनुष्य कसा वागला असता त्याला परमहंसपद प्राप्त करून घेत येईल? मला स्वत:ला त्या पदाला जाण्याची इच्छा आहे."

नारद मुनी म्हणाले, "हे धर्मराजा! गृहस्थाश्रमी पुरुष व स्त्री यांनी गृहस्थाश्रमी जीवनास आवश्यक असलेली सर्व शास्त्र-विहित कर्मे वासुदेवाची व वासुदेवासाठीच असल्याचे जाणून वासुदेवाला अर्पण करावीत. धर्म, अर्थ व काम यासाठी कमीत कमी कष्ट करावेत. रसनेवर संयम ठेवावा. सतत नामस्मरण करावे. प्रापंचिक व्यवसायातून वेळ मिळताच हरिकथा वाचाव्यात. गृह-पुत्रादिक ठिकाणी आसक्ती ठेवू नये. मन सदैव ईश्वराकडे लावलेले आसावे. सर्व भूतमात्रांच्या विषयी अंत:करणात दया असावी. कोणत्याच कारणासाठी कोणाचाही द्वेष करू नये. इर्षा, असूया, मत्सर, स्पर्धा, अभिलाषा, स्वार्थबुद्धी, वित्तशाठ्य, चाहाडी-चुगली, लोभ, तिरस्कार, सूडबुद्धी ह्या सगळयांचा त्याग करावा. सदचारांचा अवलंब करावा. शास्त्रोक्त पद्धतीने यजन-याजन इत्यादी करावे. 'मी व माझे' या धारणेचा त्याग करावा. पर्वकाळी स्नान, जप, इत्यादी करावे. नवविधा भक्तीने आत्मनिवेदन करीत जावे. हे धर्मराजा! काया, वाचा, मने, हिंसा त्याग करावा. विधिवशात् जे प्राप्त होईल त्यात संतुष्ट असावे. निरिच्छ व स्वस्वरूपी रममाण असलेल्याला भगवंत स्वत:च चरितार्थाचे साधन पुरवितो. त्यामुळे त्याला होणारे समाधान इतरांना मिळू शकत नाही. पण त्यासाठी सर्व संकल्पांचा त्याग करावा लागतो. वासनेवर जय प्राप्त करून घ्यावा लागतो. तत्व विचारांनी संसारभय नष्ट करावे. आत्मानात्मविवेकाने शोक व मोह मुक्त व्हावे. दैवाने प्राप्त झालेले दु:ख मनाच्या साम्यावस्थेने नाहीसे करावे. सत्वगुण वृद्धिंगत करावा. गुरूंच्या ठिकाणी दृढ श्रद्धा ठेवावी व त्यांना देहधारी समजू नये तर साक्षात परब्रम्ह असल्याची भावना सातत्याने ठेवावी. काम, क्रोध, मोह लोभ, अहंकार, बल, दर्प, परिग्रह यांचा पूर्ण त्याग करणे अत्यावश्यक असते. देह मरणधर्मी आहे व आत्मा नाही. हे लक्षात ठेवून देहाला शाश्वत न समजता सतत आत्मज्ञानाचा अभ्यास करीत राहावा. श्रीगुरुचरण सेवेत

भगवान श्रीहरीच्या स्मरणाने ज्ञानखड्ग धारण करून राग, द्वेष, मद, मोह, मत्सर, दंभ, लोभ, भय, मान-अपमान, उच्च-नीच, वंचना, आग्रह, प्रमाद, क्षुधा, तृषा, निद्रा, इत्यादी शत्रूंचा नाश करावा. देहाच्या आरंभी कारणरूपाने अंतर्गत उच्च नीच, ज्ञान-ज्ञेय, वचन-वाच्य, तम-प्रकाश, असे जे काही आहे ते सर्व परब्रम्ह असल्याची धारणा पक्की करावी. मायेमुळे ती सतत लोप पावत असते. पण आपण परमेश्वराचे अखंडत्व जाणून भावाद्वैत साधावे. काया वाचा मने सर्वकर्म परमेश्वराला अर्पून क्रियाद्वैत साधावे. सर्व चराचराचा भोक्ता परमेश्वर आहे या धारणेने द्रव्याद्वैत साधावे. अशाप्रकारे भगवान श्रीकृष्णांना शरण जाऊन स्वत:ला विसरावे. त्यामुळे अखंड मंडलाकार असलेल्या श्रीकृष्णांच्या धारणेने संपूर्ण विश्वातल्या पदार्थांविषयी अनासक्ती निर्माण होते. मग परमहंसधर्म म्हणजे काय ते समजू लागते. हळूहळू तो अंगात मुरु लागतो. व मग तो पूर्ण पणे मुरल्यावर आपोआपच परमहंसपद प्राप्त होते.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

इथे श्रीमद्भागवतातला सातवा स्कंध पूर्ण झाला. या स्कंधात एकूण १५ अध्याय व ७५० श्लोक आहेत. त्या सर्वांचा पुष्प ९२ ते पुष्प १०० हा साररूप अनुवाद आहे

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०१ वे (अध्याय १, २, ३, ४,)

## मन्वंतर वर्णन व गजेंद्रमोक्ष कथा

शुकाचार्य पुढे सांगू लागले, " राजन्! स्वायंभूव मनू कालांतराने विरक्त झाला. भार्या शतरूपेसह वनात तपाचरणास निघून गेला. तपाने झालेल्या ज्ञान प्राप्ती नंतर तो ' ज्याच्या योगे विश्व सचेतन होते, जो सर्वकाळ सर्वांना जाणतो, पण त्याला कोणीही सचेतन करू शकत नाही वा जाणूही शकत नाही. ज्याचे ज्ञान कधीही नष्ट होत नाही त्या सर्वान्तर्यामी व नि:संग परमेश्वरास मी शरण जातो." अशी एकाग्र चित्ताने वैदिक प्रार्थना करीत असताना काही क्षुधा पीडित राक्षस व असुर त्याला खाण्यासाठी धावून आले. त्याच क्षणी भगवंताने यज्ञ नामक अवतार धारण केला. यम नावाच्या दैत्यांना आपल्या सहाय्यास घेतले आणि त्या राक्षसांना व असुरांना ठार केले. त्यावेळी अग्निचा पुत्र स्वारोचिष दुसरा मनू झालेला होता व स्वारोचिष मन्वंतर सुरु झाले होते. स्वारोचिष मन्वंतराचा कालावधी संपल्यावर प्रियव्रताचा पुत्र उत्तम तिसरा मनू झाला. उत्तमानंतर त्याचा भाऊ तमस चवथा मनू झाला. ते तामस मन्वन्तर. तामस मन्वंतरात मकरापासून गजेंद्राचे रक्षण करण्यासाठी भगवंताने श्रीहरी नामक प्रसिध्द अवतार धारण केला.

इथे परीक्षित राजाने गजेंद्रमोक्षाची कथा विचारली म्हणून शुकमुनी सांगू लागले, " राजन्! त्रिकुट नामक रम्य पर्वतावर आपल्या हत्तीणींसह विहार करीत असलेल्या गजेन्द्राला तहान लागली म्हणून तो एका सरोवरात उतरून हत्तीणीसह जलपान करू लागला. जलपाना नंतर हत्तीणींसह जलक्रीडा करू लागला. त्यावेळी सरोवरातल्या एका बलाढ्य मकराने गजेन्द्रचा पाय पकडला व त्याला पाण्यात खेचू लागला. गजेन्द्राने हत्तीणींसह खूप प्रतिकार केला. पण त्या बलाढ्य मकरापुढे काहीच उपयोग होईना. त्याचवेळी गजेन्द्राने प्राणाच्या आकांताने भगवंताचा धावा करण्याचा निश्चय केला. आणि चमत्कार असा कीं त्या गजेन्द्राला पूर्व मानवजन्मातली स्मृती आली. व मानवजन्मात असताना तो जी प्रार्थना करीत असे ती प्रार्थना तो करू लागला. (हे "गजेंद्रमोक्ष" नामक स्तोत्र स्कंध ८, अध्याय ३, श्लोक २ ते २९ इतके आहे ) त्यांत सुरुवातीला जरी गजेन्द्राने प्राण वाचावे म्हणून प्रारंभ केला होता तरी प्रार्थना करता करता त्याला जो बोध होत गेला त्यामुळे तो इतका विरक्त झाला कीं त्याची देहासक्तीच नष्ट झाली व तो परमात्म्याला

विनवू लागला हे भगवन्! मी आतां ह्या मकरापासून मुक्त होण्याची आशा करीत नाही. अंतर्बाह्य अविवेकाने प्राप्त झालेल्या या हत्ती योनिशी माझा काय संबंध आहे? मला केवळ आत्मज्ञान प्राप्त व्हावे अशी मी प्रार्थना करतो. (श्लोक २५ ) आणि तो गजेंद्र विश्वनियंत्या ईश्वराशी तादात्म्य पावण्याचा प्रयत्न करू लागला. तेंव्हा त्याला तो परमात्मा आपल्यातच असल्याचा बोध होऊन त्याने प्रार्थनेतला शेवटचा श्लोक असा गाईला, कीं हे परमेश्वरा! आमच्यातच वास करूनही आम्ही देह अहंकारामुळे तुला जाणू शकत नसल्यामुळे मी तुला पूर्ण शरण आलो आहे.” राजन्! गजेंद्राने अतिलीन होऊन केलेली ही प्रार्थना ब्रम्हादिकांनी मनावर घेतली नाही. त्यामुळे विश्वनियंता परमात्मा स्वत:च श्रीहरीच्या रूपाने गरुडावरून शंख, चक्र, गदा, पद्म धारण करून गजेंद्रा जवळ आला.

भगवंताला श्रीहरीच्या रुपात आलेले पाहून गजेंद्राने जवळच असलेले कमल सोंडेने श्रीहरीच्या दिशेने फेकून मनोमन शेवटचा नमस्कार केला. त्याच क्षणी श्रीहरीने लीलया मकरासह गजेंद्राला बाहेर काढून भूमीवर ठेवले. आपल्या सुदर्शनचक्राने त्या मकराचे मुख विदारण केले व गजेंद्रास मुक्त केले. मकराचे मुख विदारण होताच त्यातून हु हु नामक गंधर्व शाप मुक्त होऊन आपल्या मूळ स्वरूपात बाहेर पडला. गंधर्वाने भगवंताची उचित शब्दात स्तुति केली. श्रीहरिला प्रदक्षिणा घातली. साष्टांग नमस्कार केला. श्रीहरीच्या परवानगीने गंधर्व स्वस्थानी निघून गेला. राजन्! गजेंद्रही पूर्व जन्मातला पांड्यनरेश इंद्रद्युम्न होता. राजा असताना भगवान श्रीविष्णुभक्त होता. रोज स्वत:ला विसरून पूजा करीत असे. तो पूजा करीत असताना अगस्ती मुनी त्यच्याकडे आले. राजा देहभानावर नव्हता. ध्यानमग्न झालेला होता. त्यामुळे इंद्रद्युम्न अगस्तीमुनींच्या स्वागतास गेला नाही. त्या गोष्टीचा अगस्तींना अपमान वाटून त्यांनी इंद्रद्युम्न राजाला हत्ती योनीत जाण्याचा शाप दिला. इंद्रद्युम्नाने आपले प्रारब्ध म्हणून तो शाप स्वीकारला. देहत्याग करून लगेच गजेंद्र झाला. मकराने पकडले तेंव्हा त्याला श्रीविष्णूंचे स्मरण झाले. हे चरित्र श्रवण करणाऱ्यांना यशप्राप्ती, दु:स्वप्न नाश व अंती

सद्गती प्राप्त होते.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०२ वे (अध्याय ५, ६, ७ पूर्ण )

## सागरमंथन

शुकमुनी पुढे सांगू लागले, " तामस मन्वंतरा नंतर त्याचा भाऊ रैवत हा मनू झाला. ते पांचवे रैवत मन्वंतर. ह्या मन्वंतरात भगवंताने विकुंठ या नामाने अवतार धारण केला. व आपल्या पत्नीच्या आग्रहाखातर वैकुंठाची अत्यंत दिव्य व आश्चर्यकारक रचना केली. नंतर चक्षुचा पुत्र सहावा मनू झाला. ते सहावे चाक्षुष मन्वंतर. या मन्वंतरात श्रीहरीने अजित नामक अवतार धारण करून क्षीरसागराच्या मंथनाने देवांना अमृत मिळवून दिले. अमृत मंथनाचे वेळी कूर्मावतार धारण करून मंदार पर्वताला आपल्या पाठीवर धारण केले.

हे ऐकून परीक्षित राजाने विचारले, " हे प्रभो! क्षीरसागर मंथन कां केले? आणि मंदार पाठीवर कां धारण केला? "

श्रीशुकाचार्य सांगू लागले, " राजन्! पूर्वी देव दानव युद्धात अनेक देव मृत्युमुखी पडू लागले. त्यातच देवांना दुर्वास मुनींनी शाप देऊन ऐश्वर्यहीन करून टाकले. त्यामुळे देव ब्रम्हदेवांकडे आपले गाऱ्हाणे घेऊन गेले. ब्रम्हदेवांनी श्रीहरीची प्रार्थना केली. तेंव्हा प्रकट होऊन भगवान श्रीहरी म्हणाले, " ब्रम्हदेवा, इंद्रा व लोकपाल हो! धर्माचरणाने बळीने काल अनुकूल करून घेतला आहे. तेंव्हा तुम्ही दैत्यांकडे जाऊन दैत्यांशी सख्य करा. कारण मोठे काम साधण्यासाठी शत्रूशी सुध्दा मैत्री करवी लागते. त्यानंतर त्यांच्या समोर सागरमंथनाचा प्रस्ताव मांडा व अमृत उत्पन्न करण्याचा त्यांच्या सह प्रयत्न करा. वासुकी सर्पाची दोरी करा, मंदार पर्वताची रवी करा, मग माझ्या सहाय्याने सागरमंथन करा. त्यासाठी दैत्य तुमच्याकडे जे मागतील ते तुम्ही मान्य करा. कारण साममार्गाने कार्यात मिळणारी सिद्धी क्रोधावेशाने मिळत नाही. तसेच सागरमंथनातून मिळणाऱ्या कोणत्याही वस्तूंविषयी तुम्ही लोभ ठेऊ नका. अथवा त्या दैत्यांना दिल्या गेल्यास क्रोधवश होऊ नका. तसेच काळकुट नामक विषाच्या उत्पत्तीने घाबरून जाऊ नका." इतके सांगून श्रीहरी अंतर्धान पावले. इंद्रादी देव लगेच बळीराजाकडे आले. संधी-विग्रहाचे अपूर्व ज्ञान असलेल्या बळीने

त्यांना सन्मानाने आसनादि देऊन विचारपूस केली. तेंव्हा देवांनी मोठ्या उमेदीने बळीला सागरमंथनाची कल्पना सांगितली व त्या कामी दैत्यांचे सहाय्य मागितले.

बळीराजासह सर्व दैत्यांनी ती कल्पना मान्य केली व देवांबरोबर मंदार पर्वत उपटून सागराकडे निघाले. पण असह्य भारामुळे त्याखाली चिरडले जाऊ लागले. ते पाहून श्रीहरीने गरुडाकडून तो पर्वत लीलया सागरात नेउन ठेवला. त्यानंतर वासुकीला अमृत देण्याचे कबूल करून सर्वांनी वासुकीला मंदार पर्वतास दोर म्हणून गुंडाळले. त्यावेळी भगवान श्रीहरी स्वत:च तिथे प्रकट झाले व त्यांनी वासुकीला मुखाकडून पकडले. म्हणून देवही त्यांच्या मागे गेले. तेंव्हा शेपटीकडे जाणे अपमानास्पद वाटून दैत्यांनी शेपटी कडून वासुकीला धरण्यास नकार दिला. श्रीहरिला तेच हवे होते. श्रीहरी लगेच शेपटी कडे गेल्यामुळे देवही तिकडे गेले. दैत्य आनंदले. सागर मंथन सुरु झाले पण मंदार पर्वत घुसळताना पर्वत खाली खाली जाऊ लागला. अर्थात हे विघ्न विघ्नेश्वराची पूजा न केल्यामुळे उद्भवल्याचे जाणून भगवान श्रीहरींनी स्वत:च त्याचे निवारण कण्यासाठी कूर्म रूप धारण करून त्याला आपल्या पाठीवर धारण केला. व शिखराकडे सहस्त्र हातांनी आधार दिला. कार्य सुरळीत पार पडावे म्हणून श्रीहरिनी शक्तीरूपाने देव व दैत्य यांच्यात प्रवेश केला. आणि निद्रारुपाने वासुकीत प्रवेश केला. त्यमुळे मंथन सुरळीत होऊ लागले. पण प्रत्यक्ष मंथनाचे वेळी वासुकी विष ओकू लागल्याने देव व दैत्य निस्तेज झाले. म्हणून एकटे श्रीहरीच विशाल रुप धारण करून मंथन करू लागले. तेंव्हा सागरात प्रचंड खळबळ माजली व हलाहल नामक वीष वर तरंगू लागले. देव व दैत्यांना प्रचंड अस्वस्थता आली म्हणून ते भगवान शिवांच्या आश्रयास आले. व आपल्याला हलाहला पासून वाचवण्याची प्रार्थना करू लागले. भगवान शिवांना देव व दैत्यांचा कळवळा आला व मृडानिच्या अनुमोदनाने त्यांनी हलाहलाचे प्राशन केले. त्यामुळे भगवान शिवांचा कंठ निळा झाला. त्यांचा तो अचाट पराक्रम पाहून भगवान विष्णु , ब्रम्हदेव व मृडानी यांनी नीलकंठ असे संबोधून त्यांची यथोचित स्तुति केली.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

॥श्रीगुरु:शरणं॥

## श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०३ वे (अध्याय ८ व ९ पूर्ण)

# अमृत प्राप्ती

भगवान शिवांनी हलाहल प्राशन केल्यामुळे देव-दैत्य खुश झाले. पुन्हा जोमाने मंथन सुरु झाले. आणि मंथनातून कामधेनु प्रकट झाली. ती होमद्रव्यासाठी ऋषींनी स्वीकारली. मग उच्चश्रवा अश्व प्रकटला तो बलीराजाने घेतला. त्याच्या पाठोपाठ ऐरावत बाहेर आला. तो इंद्राला मिळाला. त्यानंतर कौस्तुभमणि प्रकट झाला. तो श्रीहरीने घेतला. नंतर पारिजात निघाला तो स्वर्गात स्थापन केला. मग अप्सरा उत्पन्न झाल्या त्या स्वर्गात गेल्या. नंतर लक्ष्मी प्रकट झाली. तिने आपल्याला वरवे म्हणून सर्व देव दानव आशाळभूता सारखे तिच्याकडे पाहू लागले. पण प्रत्येकात तिला काहीना काही वैगुण्य आढळल्यामुळे तिने सर्वांना डावलून कोणतेच वैगुण्य नसलेल्या श्रीहरिला वरले. भगवान श्रीहरीने आपले वक्षस्थळ तिचे निवासस्थान केले.

त्यानंतर पुन्हा मंथनाला आरंभ झाला आणि त्यातून धन्वंतरी प्रकट झाला. त्याच्या हातात अमृत कलश होता. अमृत कलश पाहून असुर लालचावले. त्यांनी धिटाईने धन्वंतरीच्या हातातून तो कलश हिसकावून घेतला व पळत सुटले. देव आगतीकतेने श्रीहरिला शरण गेले. श्रीहरिला शरण जाता क्षणीच श्रीहरीने अभय दिले. व आपल्या वैष्णवी मायेने प्रत्येक असुराच्या मनात मी आधी अमृत पिणार अशी इच्छा उत्पन्न केली. त्यामुळे बलवान असुर कलश घेऊन पळत सुटले. बाकीचे त्यांचा पाठलाग करू लागले. आणि हाकाटी पिटू लागले कीं देव दैत्य यांनी सारखीच मेहनत केली असल्याने त्यांनाही त्यांचा वाटा मिळाला पाहिजे. त्यामुळे प्रचंड कलह निर्माण झाला.

त्या कलहाचा फायदा घेऊन श्रीहरीने स्वत:च अद्भुत व कमनीय असे मोहिनीचे रूप धारण केले. अपूर्व सुंदर व अप्रतिम वस्त्रालंकार परिधान केलेली मोहिनी नूपुरांचा मंजुळ आवाज करीत ठुमकत ठुमकत असुरांसमोरून चालू लागली तेंव्हा सगळेच असुर थबकले. अमृतकुंभ हातात असलेला दैत्यही थबकला व मोहिनीशी बोलू लागला, " हे कमलनयने! जरा थांब! तूं अद्याप पुरुषस्पर्श विरहीत दिसतेस! त्यामुळे आमच्या कल्याणाचा विचार करावास असे मला वाटते. हे सुंदरी! आम्ही सगळे कश्यपपुत्र असून एकमेकांचे भाऊ आहोत. मोठ्या कष्टाने आम्ही हे अमृत प्राप्त केले आहे. पण त्याच्या प्राशनावरून आता गोंधळ माजला

आहे व  स्पर्धा निर्माण झाली आहे. यास्तव तूं आमच्यात लढा न होईल अश्या प्रकारे या अमृताची वाटणी करावीस असे माझ्या मनात येते." इतर असुरांनी त्याला मान्यता दर्शवली. तेंव्हा आपल्या नेत्र कटाक्षाने दैत्यांना घायाळ करीत मोहिनी म्हणाली, "  माझ्या सारख्या चंचल जारिणी स्त्रीवर तुम्ही आसक्त होऊन कसा काय विश्वास ठेवता हे मला समजत नाही. कोणताही ज्ञानी पुरुष अशा स्त्रीवर विश्वास ठेवीत नाही."

मोहिनीचे हे बोलणे म्हणजे प्रणयरूप थट्टा समजून काही एक विचार न करता तो अमृत कलश त्यांनी मोहिनीच्या स्वाधीन केला. तेंव्हा गोड शब्दात मोहिनी म्हणाली, " मी केलेला निर्णय योग्य अथवा अयोग्य कसाही वाटला तरी तुम्ही मानणार असाल तरच मी अमृताची वाटणी करते! अन्यथा तुमचा कलश तुम्ही सांभाळा!"

भगवंताच्या मायेमुळे मोहिनीच्या मनाचा थांग न लागलेले दैत्य इतके कामासक्त झाले होते कीं हुरळून जाऊन त्यांनी मोहिनीचे बोलणे मान्य केले. ती म्हणेल ते त्यांना स्वत:च्या हिताचेच वाटत होते. मोहिनीच्या सूचने प्रमाणे देव व दानव अशा दोन वेगळ्या पंगती बसल्या. मोहिनीने प्रथम देवांना अमृत वाटण्यास सुरुवात केली. त्यावेळी दैत्य मोहिनीच्या हालचालीवर इतके फिदा झाले होते कीं ते तिचे सौंदर्यामृत पानाने तृप्त होऊ लागले व देव अमृतपानाने अमर होऊ लागले.

इतक्यात चंद्र व सूर्य यांच्या मध्ये देवांचे रूप धारण  करून राहू बसल्याचे चंद्र व सूर्य यांच्या लक्षात आले व त्यांनी ते मोहिनीच्या निदर्शनास आणले. तेंव्हा भगवंताने क्षणातच सुदर्शन चक्राने राहूचे मस्तक धडा वेगळे केले. पण तोवर राहूच्या मुखात गेलेल्या अमृतामुळे त्याचे मस्तक अमर झाले. ते पाहून श्रीहरीने त्या मस्तकाला ग्रहमंडळात स्थान दिले. पण चंद्र व सूर्य यांनी आपली चहाडी केली म्हणून राहू काळाच्या अनुकूलते प्रमाणे चंद्र व सूर्य याना ग्रहणाच्या निमित्ताने ग्रासू लागला. मोहिनीने सर्व देवांना अमृतपान दिले. देवांना अमृत मिळाले व  दैत्यांना ते मिळाले नाही हा फलभेद दैत्य श्रीहरीला शरण न गेल्यामुळे निर्माण झाला. देवांना अमृतपान देऊन झाल्यावर सर्वांच्या समोरच मोहिनीने आपले खरे रूप प्रकट केले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

पुष्प १०४ वे (अध्याय १० व ११)

## देवासुर संग्राम

भगवान श्रीहरी मोहिनीचे रूप त्यागून आपल्या खऱ्या रुपात प्रकट झाले. सगळेच आश्चर्य चकित होऊन पहात असतानाच गरुडावर बसून आपल्या अगम्यस्थानी निघूनही गेले.

इतकी मेहनत करून अमृत न मिळाल्यामुळे असुर संतापून देवांशी युद्धाला आले. देव आता अमृतपानामुळे सतेज झाले होते. मयासुराने युध्द सामग्रीसह बनवलेल्या वैहायस नामक अद्भुत व अदृश्य विमानातून संतापलेल्या विरोचन पुत्र बलीने इंद्रावर हल्ला केला. त्याच वेळी मयासुराने आपल्या मायावी शक्तीचा वापर करून देवांच्या विजयाला थोपवले. श्रीहरिला शरण गेलेले देव पुनश्च श्रीहरीचा धावा करू लागले.

भगवान श्रीहरी गरुडावरून तिथे आले व त्यांनी कालनेमी, माली, सुमाली, इत्यादी बलवान असुरांना आपल्या सुदर्शनचक्राने कापून काढले. मयासुराची राक्षसी माया आकर्षित केली. कारण विश्वातल्या यच्चयावत् शक्ती या भगवान श्रीहारीच्याच असतात. व त्यांच्याच आधीन असतात. भगवान श्रीहरी आपले कार्य करून निघून गेले आणि इंद्राला जोम चढला. कारण आता बलीची राक्षसी माया नष्ट झाल्यामुळे बली इंद्राला दिसू लागला.

बली दिसताच इंद्र बलीला तिरस्काराने म्हणाला " अरे कपट्या ! मायेच्या बळावर आम्हाला जिंकण्याचा तुझा प्रयत्न आमच्या समोर चालणार नाही. हे मंदबुद्धे बले! या वज्राने मी तुझे शिर छेदून टाकतो. आणि तुला अधोगतीला पाठवतो. तूं आपल्या ज्ञातीबांधवांसह स्वत:चे रक्षण करण्याचा प्रयत्न कर!" इंद्राला साक्षात सर्वशक्तिमान श्रीहरीच सहाय्य करीत असल्याचे जाणून बळी म्हणाला, " अरे इंद्रा! युद्धात जय पराजय, कीर्ती, मृत्यू इत्यादी काळाच्या अनुकुलतेने घडणाऱ्या गोष्टी असतात. पण त्या बाबतीत तुम्ही अज्ञानी आहात. सगळे सामर्थ्य आपल्या हाती असल्याच्या भ्रमात बोलणाऱ्या इंद्रा! मला तुझी कींव येत आहे. तुझ्या या असल्या वल्गनांनी माझा मर्मभेद होणार नाही. "

बळीचे हे कटुसत्य इंद्राला चांगलेच झोंबले. व वज्र सोडून त्याने बळीला ठार केले. बलीवर वज्र सोडताच संतापलेल्या जम्बासुराने ऐरावताच्या मस्तकावर आपल्या गदेचा प्रहार केला. ऐरावत विव्हळत खाली बसला. मातलीने प्रसंगावधानाने लगेच रथ इंद्राच्या समोर आणला. इंद्र रथारूढ झाला. जम्बासुरानेही मातलीच्या स्वामीनिष्ठेची प्रशंसा केली. इतक्यात इंद्राने वज्र सोडून जम्बासुराला ठार केले. जम्बासुराला मारल्याचा वृत्तांत नारदांनी जम्बासुराचा भाऊ नमुचीला सांगितला. नमुची त्वरित इंद्रा समोर आला. इंद्राने वज्र सोडले पण वज्र निष्प्रभ होऊन इंद्राकडे परत आले. इंद्र चक्रावला. उद्वेगाने वज्र त्यागाचा विचार करू लागला. इतक्यात त्याला परावाणीने सूचना मिळाली कीं वज्र फक्त नमुचीवर चालणार नाही. कारण त्याने तपाने माझ्याकडून तसा वर प्राप्त केलेला आहे. त्यामुळे त्याला आर्द्र किंवा शुष्क अशा कोणत्याच अस्त्रापासून मृत्यू येणार नाही. यास्तव शुष्कही नाही व आर्द्रही नाही अशा अस्त्राचा वापर कर.

इंद्राने क्षणभर विचार केला व आर्द्रही नाही आणि शुष्कही नाही अशा समुद्रफेसाच्या परीघाने नमुचीचा गळा कापला. सर्व देव आनंदले व भराभर दैत्य मारत सुटले. दितीची सगळी प्रजा नष्ट होणे योग्य होणार नाही अशा विचाराने ब्रम्हदेवांनी नारदांच्या मध्यस्थीने शांतता प्रस्थापित केली. नारदांच्या मध्यस्थीला मान देऊन देव स्वर्गात निघून गेले. दैत्यांनी बलीचे कलेवर उचलून अस्ताचल पर्वतावर शुक्राचार्यांच्या समोर आणून ठेवले. शुक्राचार्यांनी आपल्या संजीवनी मंत्राने बलीला सजीव केले. लोकव्यवहार आत्मसात केलेला बली सजीव होताच शांत बसून राहिला. त्याला पराभवाने खिन्नता आली नाही कीं सजीव झाल्याचा आनंदही नाही.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०५ वे (अध्याय १२ व १३)

## भगवान शिवांना मोहिनीचे दर्शन

भगवान श्रीहरींनी मोहिनीचे रूप धारण करून दैत्यांना मोहविल्याचे समजल्यावर भगवान शिव व पार्वती श्रीहरीच्या निवासस्थानी आले. आगत स्वागत झाल्यावर श्रीहरीचे पूजन करून भगवान शिव म्हणाले, " हे प्रकृती व पुरुष यांच्या पर असलेल्या भगवंता! आपले नरसिंहादी अवतार आम्ही पहिले आहेत. पण ज्या रूपाने तूं दैत्यांना मोहित केलेस व देवाना अमृत पान दिलेस ते रूप मी पाहिलेले नाही. त्या रूपाचे मला दर्शन घडावे या इच्छेने मी इथे आलो आहे."

भगवान श्रीहरी अत्यंत गूढ हसले आणि बोलणे चालू असतानाच अंतर्धान पावले. भगवान शिव इकडे तिकडे पाहू लागले. तेव्हा भव्य प्रवेशद्वारातून बाहेरच्या रम्य उद्यानातील कन्दुकाशी (चेंडूशी) खेळणाऱ्या एका सुंदर व मोहक युवतीवर त्यांची दृष्टी गेली. ती युवती ऐन तारुण्याच्या उंबरठ्यावर उभी होती. तिची कमनीय आकृती चांगलीच आकर्षक होती. चेंडूच्या गती बरोबर ती खाली वाकल्यावर तिच्या गळयातले रत्नहार स्तनांपासून विलग होत तेंव्हा तर ती फारच सुंदर दिसत असे. भगवान शिव तिच्याकडे टक लावून पहात राहिले. त्याचवेळी उरोजावरील सैल होणारा पदर व हेलकावे खाऊन पुढे येणारी वेणी मानेला गोड लचका देवून डाव्या हाताने सावरताना तिची चंचल नजर शिवांवर गेली. दोघांची नजरा नजर झाली. आणि आपल्या मोहक नेत्रकटाक्षाने तिनेही शिवांना प्रतिसाद दिला. वाऱ्याने उडणाऱ्या तिच्या वस्त्रांनी जेंव्हा तिची कमनीय आकृती अधिकच कमनीय दिसू लागली तेंव्हा आधीच घायाळ झालेले शिव विचारशक्ती क्षीण झाल्यासारखे उठून तिच्या मागे जाऊ लागले. काम जिंकलेल्या शिवाची ही स्थिती पाहून मृडानी आश्चर्य चकित झाली. पण कोणताही संकोच न बाळगता भगवान शिव त्या युवतीच्या मागे धावू लागले.

भगवान शिव आपल्या मागे येत असल्याचे लक्षात येताच ती युवतीही खट्याळपणाने एका वृक्षा आड गेली. त्यावेळी कामाआतुर झालेल्या शिवांनी ती प्रतिकार करीत असतानाही बलात्काराने तिला आपल्या बाहूपाशात घेतले. तरी अत्यंत चपळतेने ती भगवान शिवाच्या बाहूपाशातून निसटली. तिच्या स्पर्शामुळे कामरुपी शत्रू जिंकलेल्या शिवांनाही आपला काम आवरता येईना. ते तिच्या मागे धावत सुटले.

धावता धावता त्यांचे वीर्य इंद्रियाद्वारे बाहेर पडून पृथ्वीवर सांडू लागले. जिथे जिथे ते वीर्य सांडले तिथे तिथे काही ठिकाणी सोन्या-रुप्याच्या खाणी व काही ठिकाणी स्वायंभूव शिवालये निर्माण झाली.

रेत स्खलन पूर्ण झाल्यावर शिव पूर्ण मोह निवृत्त झाले. त्यांना योगमायेचे सामर्थ्य माहित होते. त्यामुळे श्रीहरीच्या त्या गूढ हास्याचा अर्थ त्यांच्या लक्षात येऊन शिव निश्चिंत झाले. मूळस्वरूप धारण करून भगवान श्रीहरी शिवांना म्हणाले, " हे सुरश्रेष्ठा! माझ्या मोहिनीरूपावर मोहून जाऊन पुन्हा पूर्व पदावर आलास हे फार उत्तम झाले. तूं माझी माया तरून गेलास. आता तुला माझी त्रिगुणी माया कधीच मोहित करणार नाही.

महादेवांनी मृडानीसह श्रीहरिला प्रदक्षिणा करून स्वस्थानी गमन केले. वरील सर्व प्रसंगातील गर्भित अर्थ जाणून घेण्याची इच्छा मृडानीने व्यक्त केली. भगवान शिव म्हणाले, " देवी! जन्मादि विकारशून्य परमात्म्याच्या मायेच्या योगाने मी सुध्दा किती मोह पावलो? काम जिंकलेल्या माझीच ही अवस्था तर मग इंद्रीयाधीनांची काय अवस्था होत असेल? हे मृडानी! मागे तूं विचारले होतेस कीं आपण स्वत: ईश्वर असून ध्यान कुणाचे करता? त्याचे हे नि:शब्द गर्भित उत्तर आहे! " हे सांगून शुकमुनी म्हणाले, " राजन्! या आख्यानाच्या स्मरणाने व समजून घेण्याने त्या मनुष्याचा कोणताच प्रयत्न कधी निष्फळ होत नाही.

आता राजन्! मन्वंतर वर्णन थोडक्यात ऐक. विवस्वान आदित्याला तीन भार्या होत्या. संज्ञा, छाया व वडवा. संज्ञेला तीन अपत्ये झाली. यम, यमुना व श्राध्ददेव. छायेला सावर्णी, तपती (कन्या) व शनैश्चर अशी तीन अपत्ये होती. वडवेचे पुत्र अश्विनीकुमार. श्राद्धदेव विवस्वानाचा पुत्र म्हणून त्याला वैवस्वतमनू म्हणतात हा चालू मन्वंतराचा म्हणजेच वैवस्वत मन्वंतराचा अधिपती आहे. ह्या वैवस्वत मन्वंतरातच बटू वामन हा भगवंताचा प्रसिध्द अवतार झाला आहे. या नंतरच्या मन्वंतरात सावर्णी हा मनू होईल व सावर्णी मन्वंतर सुरु होईल. नवव्या मन्वंतरात वरुणाचा पुत्र दक्षसावर्णी हा मनू होऊन दक्षसावर्णी मन्वंतर सुरु होईल. दहावा मनू ब्रम्हसावर्णी होईल व ते दहावे ब्रम्हसावर्णी मन्वंतर. या ब्रम्हसावर्णी मन्वंतरात विश्वक्सेन नामक भगवंताचा अवतार होईल. अकरावे धर्मसावर्णी मन्वंतर व धर्मसावर्णी मनू होईल व धर्मसेतू नामक भगवंताचा अवतार होईल. बारावा मनू रुद्रसावर्णी होईल व रुद्रसावर्णी हे मन्वंतर सुरु होईल. त्यात स्वधामा हा भगवंताचा अवतार होईल. तेरावा मनू देवसावर्णी होईल तेच तेरावे मन्वंतर. या मन्वंतरात योगेश्वर नामक भगवंताचा अवतार होईल. चवदावा मनू इंद्रसावर्णी होईल व तेच चवदावे मन्वंतर असेल. त्यात बृहद्भानु हा भगवंताचा अवतार होईल . अशा या चवदा मन्वंतराच्या कालावधीला कल्प असे म्हणतात.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०६ वे (अध्याय १४, १५, १६ व १७ पूर्ण)

## बलीचा स्वर्गावर विजय

परीक्षितराजाने मन्वंतर व्यवस्थेविषयी उत्सुकता दर्शविली म्हणून शुकमुनी सांगू लागले, " भगवान श्रीहरीच ही सगळी व्यवस्था करीत असतात. प्रलया नंतर सृष्टीची उत्पत्ती करणे, चार युगांचा कालावधी सुरु करणे, भगवान श्रीहरींचा मनूला उपदेश होणे, कालगतीने लुप्त झालेले वेद सप्तर्षींना दिसणे, मग त्यांच्या कडून इतरांना ते ज्ञान प्राप्त होणे, इंद्रादी लोकपाल नेमण्याची व्यवस्था करणे, प्रत्येक युगात विविध अवतार घेणे. अशी चार युगे संपून पुन्हा प्रलय करणे. अशी सामान्यत: व्यवस्था असते.

परीक्षित राजाने बलीराजाला तो निरपराध असतानाही बंधनात कां पडावे लागले? व भगवान स्वत: पूर्ण मनोरथ असूनही त्यांनी बलीकडून तीन पावले भूमी कां मागितली? असे विचारले म्हणून शुकमुनी सांगू लागले, " राजन्! शुक्राचार्यांनी बलीला पुन्हा जिवंत केल्यावर बलीने शुक्राचार्यांची गुरु म्हणून जी निरपेक्ष सेवा केली, त्या सेवेने शुक्राचार्य प्रसन्न झाले. इतके कीं त्यांनी बलीला महाभिषेकाने राजा करून विश्वजित नामक यज्ञ करवून घेतला. बलीने श्रीहरीचरणी लय लावून यज्ञ केल्यामुळे यज्ञ नारायण प्रसन्न झाले व त्यांनी बलीला दिव्य अश्व, शस्त्रास्त्रे, रथ इत्यादी देऊन गौरविले. त्यामुळे बली अत्यंत तेजस्वी झाला. बलीने सर्व दैत्याधीपतीना एकत्र केले. व स्वर्गावर चढाई केली. रम्य अशा इंद्रपुरीला बलीच्या सैन्याने घेरले. इंद्र, देवगुरु बृहस्पतींच्याकडे धावला! पण बृहस्पतींनी बलीचे आचरण व त्याने प्राप्त केलेले सामर्थ्य जाणून इंद्राला स्वर्ग सोडून गुप्तरूपाने वावरण्याचा सल्ला दिला. आणि सांगितले जो पर्यंत बलीकडून त्याच्या गुरूंच्या मनाविरुद्ध वर्तन घडत नाही तोवर तुम्हाला काहीच करता येणार नाही. त्यामुळे त्या दिवसाची वाट पाहत काळ कंठणे या खेरीज तुम्हाला दुसरा पर्याय नाही.

इंद्र सर्व परिवारासह स्वर्ग सोडून पृथ्वीवर गुप्त रूपाने भ्रमण करू लागला व बलीने स्वर्गाचा ताबा घेतला व धर्माधिष्ठीत राज्य करू लागला. सर्व विश्व बलीच्या नियंत्रणात आल्यावर शुक्राचार्यांनी बली कडून

शंभर अश्वमेध यज्ञ करून घेतले. त्यामुळे बलीराजा आपल्या तेजाने तळपू लागला. इंद्रादी अदितीचे पुत्र स्वर्गभ्रष्ट होऊन पृथ्वीवर हिंडू लागल्याचा अदितीला अत्यंत खेद वाटू लागला. ती उदास व कष्टी झाली. पण कश्यपांच्या सेवेत जराही उणीव ठेवीत नव्हती.

कश्यापांच्या हे लक्षात आलेच. त्यांनी अत्यंत स्नेहभावाने तिच्या दु:खाची विचारपूस केली. अदिती भावविवश होऊन पण समयोचित बोलू लागली, " भगवन्! आपण प्रजापती आहात. आपण सर्व सृष्टीकडे समभावाने पहाता. तथापि परमेश्वरही आपल्या भक्तांवर कृपा करतोच. त्याप्रमाणे हे प्रभो, आपणही भक्त वत्सल आहात. माझे पुत्र स्थानभ्रष्ट होऊन पृथ्वीवर फिरत आहेत. त्यामुळे माझ्या मनास कशी बरे स्वस्थता वाटावी. तरी मला माझ्या पुत्रांना पूर्वस्थान प्राप्त होण्याचा मार्ग सांगावा." प्रजापती कश्यप म्हणाले, " हे भद्रे! हे संपूर्ण विश्व विष्णुमायेने व्याप्त आहे. त्यामुळे सद्भक्तांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या वासुदेवाचे तूं पयोव्रत कर. हे देवी, या व्रताची सुरुवात फाल्गुन शुध्द प्रतिपदेस करावी. शुक्ल प्रतिपदा ते शुक्ल द्वादशी पर्यंत भक्तियुक्त अंत:करणाने प्रथम मंत्रयुक्त ध्यान करावे. मग श्रीहरीचे षोडशोपचार पूजन करावे. पूजनातला प्रत्येक उपचार 'ओम नमो भगवते वासुदेवाय' या मंत्राने द्यावा. फाल्गुन प्रतिपदा ते द्वादशी पर्यंत फक्त दुग्ध प्राशन करून राहावे. सतत नामस्मरण करावे. मग त्रयोदशीला ब्राम्हण-सुवासिनी भोजन घालून आपण पारणे करावे. ह्या व्रताने तुझा मनोरथ पूर्ण होईल.

अदितीने मन:पूर्वक अत्यंत भक्तीने हे पयोव्रत केले. मनात येणाऱ्या सगळया संकल्प विकल्पा कडे दुर्लक्ष करून अदिती सत्वगुणात राहून हरीस्मरण करीत करीत हे व्रत करीत होती. त्याचा सुपरिणाम झाला. त्या व्रताच्या प्रभावाने भगवान श्रीहरीनी प्रकट होऊन तिला आश्वासन दिले, " स्थानभ्रष्ट झालेल्या पुत्रांसाठी तूं केलेल्या व्रताचे फळ तुला जरूर मिळेल. पण सध्याचा काल बलीला अनुकूल आहे. अशावेळी बलाचा वापर देवांना सुखकारक होणार नाही. त्यामुळे योग्य समयी मी तुझ्या पोटी जन्म घेईन व तुझा मनोरथ पूर्ण करीन. मात्र ही गोष्ट तूं अत्यंत गुप्त ठेव." असे सांगून श्रीहरी अंतर्धान पावले. देवमाता अदिती निश्चिंत झाली. दर्शन झालेल्या श्रीहरिला ती सतत कश्यपांच्या ठिकाणी पाहू लागली. भगवान श्रीहरीने योग्य समयी काश्यापांच्या शरीरात प्रवेश केला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

## ।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०७ वे (अध्याय १८ व १९ )

## वामनाची त्रिपाद भूमीची याचना

श्रावणातल्या द्वादशीला अभिजित् नक्षत्रावर भगवान श्रीहरीने अदितीच्या पोटी जन्म घेतला. म्हणून त्या द्वादशीला विजया द्वादशी म्हणू लागले. आपल्या उदरातून उत्पन्न झालेल्या देदीप्यमान बालकाला पाहून अदिती विस्मयचकीत झाली. इतक्यात नुकत्याच जन्माला आलेल्या बालकाने माता-पिता पहात असतानाच अद्‌भुत तेजस्वी बटुवामन रूप धारण केले. त्याच क्षणी तिथे ब्रम्हदेव, देवगुरु बृहस्पती वगैरे देवदेवता प्रकट झाल्या. कश्यपांकडून महर्षींनी बटुवामनाचे जातक संस्कार व उपनयन संस्कार करवून घेतले. बृहस्पतीने यज्ञोपावित दिले कश्यपांनी कटिसूत्र अर्पण केले. भूमीने कृष्णाजीन दिले. चंद्राने दंड दिला. अदितीने लंगोटी दिली. स्वर्गाभिमानी देवतेने छत्र दिले. ब्रम्हदेवांनी कमंडलू, सप्तर्षींनी कुश, सरस्वतीने रुद्राक्ष माला, कुबेराने भिक्षापात्र व आदिमातेने भिक्षा दिली.

त्या नंतर बटुवामनाने अग्नी प्रज्वलित करून परीसमुहण केले. समिधा होम करून बटुवामन प्रार्थना करीत असतानाच देवदूतांनी बातमी आणली कीं बलीराजाला अधिक समर्थ करण्यासाठी शुक्राचार्यांच्या मार्गदर्शनाखाली नर्मदा तटाकीं भृगुकृच्छ्रात अश्वमेध यज्ञ आरंभला आहे. हे ऐकताच बटुवामन त्वरेने बलीच्या यज्ञस्थानी आले. तेजस्वी बटुवामनाला पाहून यज्ञस्थानी प्रमुख ब्राम्हणांनी त्याचे स्वागतच केले. बलीराजाला तो एक मोठा अपूर्व शुभशकुन वाटला. त्याने परम आदराने बटुवामनाचे षोडशोपचार पूजन करून चरण तीर्थ घेतले.

बली अतिशय खुश होऊन विनयाने बटुवामनास म्हणाला, " हे बटो! आपल्या आगमनामुळे माझा यज्ञ सफल झाला! आता आपण जे इच्छित असाल ते माझ्याकडून मागून घ्यावे. गायी, सुवर्ण, विवाहार्थ कन्या, समृद्ध गाव, हत्ती, घोडे, रथ, दास, दासी, धन, धन्य असे जे काही आपणास हवे असेल ते मागून घ्यावे. यावर बटुवामन म्हणाला, " हे लोकनाथा! ऐहिक व्यवहारात भृगुकुलोत्पन्न शुक्राचार्यांना तूं प्रमाण मानतोस आणि पारलौकिक धर्माविषयी प्रल्हाद आजोबांना प्रमाण मानतोस. त्यामुळे तुझे वचन कुळाला

साजेसेच आहे. शिवाय तुझ्या कुळात याचकाला देतो म्हटल्यावर माघार घेणारा नि:सत्व कृपण पुरुष आजवर झालेला नाही. तुझ्या कुळातल्या हिरण्याक्षाच्या वधाचा बदला घेण्यासाठी तुझे पणजोबा म्हणजे हिरण्यकशिपू जेंव्हा विष्णूंचा शोध करीत वैकुंठात आले तेंव्हा घाबरलेल्या विष्णुंनी सूक्ष्म रूप धारण करून हिरण्यकशिपुच्या श्वासा वाटे त्याच्याच हृदयात प्रवेश केला. त्यामुळे बाहेर शोध करणाऱ्या हिरण्यकशिपुला बाह्य विश्वात विष्णू काही सांपडले नाहीत. त्यामुळे परत न येणाऱ्या विश्वात त्याची रवानगी झाली असेच तो समजला. इतके शौर्य तुझ्या कुळात आहे. तसेच तुझा पिता विरोचन एकदा देतो म्हटल्यावर देवांना ते ब्राम्हण रूप घेऊन आलेत हे समजूनही याचना केल्यामुळे स्वत:चे आयुष्य दान केले. त्यामुळे हे दैत्यश्रेष्ठा, अत्यंत उदार अशा तुझ्या कडून मला माझ्या पावलांनी मोजली जाईल इतकी फक्त तीन पावले भूमी हवी आहे. ज्ञानी पुरुषांनी पातक घडू नये म्हणून फक्त गरजे पुरतेच स्वीकारावे म्हणून मी फक्त त्रिपाद भूमी मागत आहे."

ह्यावर बली म्हणाला, " हे ब्राम्हण पुत्रा! तुझे भाषण सुंदर व शिष्टसंमत आहे खरे! तथापि तूं अल्प वयीन असल्यामुळे स्वकार्या विषयी तुझी बुद्धी अद्याप पूर्ण विकसित झालेली दिसत नाही. मी त्रैलोक्याचा स्वामी आहे. त्यामुळे तूं एखादे द्वीप जरी मागितलेस तरी मी ते देऊ शकतो. ज्ञानी पुरुषासारखे भाषण करून अप्रबुध्दा सारखी फक्त त्रिपाद भूमी कां बरे मागत आहेस? माझ्या जवळ एकदा याचना केल्यावर आयुष्यात पुन्हा याचना करण्याचा प्रसंग येणे मला योग्य वाटत नाही. निदान तुझी उपजीविका चालेल इतकी भूमी तरी तूं मागून घे !"

बटुवामन म्हणाला, " हे त्रैलोक्याधिपते! कितीही मिळाले तरी अजितेन्द्रिय मनुष्याचे समाधान होत नसते. त्रिपाद भूमीने असंतुष्ट असणाऱ्याला अख्ख्या जंबूद्विपाने तरी कसे समाधान होणार? अर्थ व काम या विषयीचा असंतोष मनुष्याला संसारबंध निर्माण करतो. तर दैववशात् प्राप्त होणाऱ्या गोष्टीत समाधान मानणाऱ्या मनुष्याचे तेज वृद्धिंगत होते. त्यामुळे तीन पावलात मिळणाऱ्या भूमीने मी संतुष्ट होईन."

हे ऐकून बलीने तीन पावले भूमी देण्याची तयारी दर्शवली. हातात पाणी घेऊन दानाचा संकल्प करणार इतक्यात इतकावेळ शांतपणाने सगळा संवाद ऐकणारे शुक्राचार्य अंतर्ज्ञानाने सर्व जाणून बळीला म्हणाले, " हे बले! देवकार्य साधण्यासाठी हा अदितीचा पुत्र प्रत्यक्ष भगवान विष्णु आहे. तूं दानाचा संकल्प केलास कीं हा विश्वरूप धारण करून दोन पावलातच तिन्ही लोक व्यापून टाकींल. मग तिसऱ्या पावलाची व्यवस्था तूं कशी करशील? आणि निर्वाह तरी कसा करशील? त्या शिवाय वचनभंगाच्या पातकाने तुला नरक प्राप्त होईलच. अरे विरोचन पुत्रा! स्वत:च्या निर्वाहाचे साधनच नष्ट होत असेल तर देह रक्षणासाठी केलेल्या वचनभंगाचे पातक क्षम्य असल्याचे शास्त्र आहे."

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०८ वे (अध्याय २०, २१ पूर्ण व २२ चालू )

### वामनाचे विश्वरूप

शुक्राचार्यांचे भाषण ऐकून बलीने क्षणभर विचार केला. आणि मग निश्चयाने म्हणाला, " हे गुरो! आपण अत्यंत योग्य प्रकारे बोध केला आहे. तथापि एकदा देतो म्हणून वचन दिल्यावर विरोचन पुत्र कोणत्याच लोभाने वंचना करणार नाही. सत्पात्री दान करताना वचन भंगला मी जितका घाबरतो तितका मी नरकालाही घाबरत नाही. दुसरे असे कीं आपण सांगितलेल्या विपत्ती तरी कोणत्या? तर सर्वस्व गमावण्याच्या! ते तर प्रत्येकालाच केंव्हा तरी परेच्छेने गमवावेच लागणार आहे. मग एखाद्या ब्रम्हवेत्त्या याचकाची कामना पूर्ण करून स्वेच्छेने येणारे दैन्य माझ्या कल्याणासाठीच येईल असा माझा दृढ विश्वास आहे. कारण दारिद्र्य, स्थानभ्रष्टता, मृत्यू यांना मी जराही भीत नाही जितका मी वचनभंगाला भितो. आपण म्हणता त्याप्रमाणे हा जर विष्णू असेल तर तो आपल्या कीर्तीचा त्याग करूच शकणार नाही. अणि जर मी आत्ता ह्याला नाही म्हणालो तरी वचनभंगाच्या पाताकामुळे मी वध्य ठरून हा माझ्याशी युध्द करून पृथ्वी तर जिंकून घेईलच पण माझ्या मात्र सर्वस्वाची हानी होईल. शिवाय हा ब्राम्हणाच्या रूपाने आल्याने मी याच्या वधाचा विचारही मनात आणणार नाही. अथवा हा विष्णु असल्यास वधही करू शकणार नाही. त्यामुळे मी आमच्या कुळाचे सध्दर्माचरण न सोडता त्रिपाद भूमीचे दान देणारच." बलीराजाचे हे निश्चयात्मक बोलणे ऐकून शुक्राचार्य संतापले. बलीला म्हणाले, " अरे अज्ञानी मनुष्या! स्वत:ला फार ज्ञानी समजून बोलतोस पण तूं जर माझ्या आज्ञेचे उल्लंघन करशील तर तूं लवकरच ऐश्वर्य भ्रष्ट होशील." पण बली आपल्या निश्चयापासून ढळला नाही. बलीने पत्नी विन्ध्यावलीसह बटुवामनाचे पूजन करून विधिपूर्वक भूमिदान केले. आपले त्रैलोक्याचे राज्य हरण होईल हे समजूनही बलीने हे दान केल्यामुळे गंधर्वांनी आकाशातून पुष्पवृष्टी केली. इतक्यात बटुवामन रुपी अनंत शक्ती श्रीहरीचे रूप वाढू लागले.

पहाता पहाता वामनाच्या रुपात सर्व विश्व सामावले गेल्याचे दिसू लागले. असुर ते रूप पाहून भयभीत होऊन मूर्च्छित झाले. वामनाने एका पायाने पृथ्वी व्यापली व दुसऱ्या पायाने स्वर्ग व्यापला. श्रीहरीचे पाऊल सत्य लोकी येताना पाहून ब्रम्हदेवांनी आपल्या कमंडलूतील गंगा जलाने श्रीहरीचे चरण

क्षालन केले. त्यामुळे गंगा सुगंधित होऊन प्रवाही झाली. अशा प्रकारे त्रैलोक्य व्यापल्यामुळे तिसरे पाऊल ठेवायला जागा उरली नाही. त्रैलोक्य व्यापून झाल्यावर श्रीहरी पुन्हा बटुवामनाच्या रुपात यज्ञस्थानी जिथे उभे होते तिथे प्रकट झाले. ह्या वेळ पर्यंत शुद्धीवर आलेले असुर आपल्या स्वामीचे सर्वस्व हरण केले म्हणून बटुवामनावर अत्यंत संतापले. आपला स्वामी वचनबध्द आहे. हे जाणून आपणच स्वामींचे हितासाठी बटुवामनाचा वध केला पाहिजे. अशा विचाराने काही दैत्याधिपती आपली आयुधे परजू लागली. त्यावेळी भगवान श्रीविष्णूंच्या पार्षादांनी धडाधड असुर कापायला सुरुवात केली. त्यावेळी बली समयोचित भाषण करून असुरांना समजाऊन सांगू लागला, " हे दैत्याधिपतींनो क्षणभर थांबून मी काय सांगतो तिकडे लक्ष द्या. हा काल आपल्याला अनुकूल नाही. हाच काळरूप भगवंत पूर्वी आपले कल्याण करण्यास कारणीभूत होता. आता तोच आमच्यावर उलटला आहे. कालाच्या शक्ती पुढे आपले काहीच चालू शकणार नाही. ह्याच काळरूप श्रीहरीच्या कृपेमुळे आपण त्याच्याच अनुचराना पूर्वी जिंकले होते. पण आता काळाची आपल्याला अनुकुलता नसल्यामुळे तुम्ही प्रतिकार करणे थांबवा."

आपल्या राजाचे हे बोलणे ऐकून सगळे दैत्य स्तब्ध झाले. तेवढ्या वेळात गरुडाने बलीला वरुण पाशाने बध्द केले. त्यावेळी बटुवामन त्याला म्हणाला, "हे असुरा, तूं मला तीन पावले भूमी कबूल केली आहेस. आता तिसरे पाऊल मी कुठे ठेवू? जर तूं माझ्या तिसऱ्या पावलाची व्यवस्था करू शकणार नसशील तर तुला त्रैलोक्याधिपतीचा अभिमान सोडून नरकात जावे लागणार आहे." बली म्हणाला, "हे देवश्रेष्ठा, आपणास माझे वचन खोटे वाटू नये यासाठी आपण आपले तिसरे पाऊल माझ्या मस्तकावर ठेवावे. मला नरकाची भीती वाटत नाही पण वचन पूर्ती करता न येणे हे मला नरक यातने पेक्षाही भयंकर यातना देणारे आहे. हे ईश्वरा! तूं आम्हा असुरांचा अप्रत्यक्ष हितकर्ता गुरुच आहेस. कारण तूं एकटाच भय रहित आहेस. त्यामुळे माझे आजोबा प्रल्हाद तुझ्या चरणाचा आश्रय घेऊन स्थिर झाले आहेत. तेच चरण तिसऱ्या पाऊलाच्या निमित्ताने माझ्या मस्तकावर ठेव. आणि मलाही तुझ्या चरणी आश्रय दे."

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प १०९ वे (अध्याय २२ व २३)

## बलीचा सुतलात प्रवेश

'हे ईश्वरा! तूं आम्हा असुरांचा अप्रत्यक्ष हितकर्ता गुरु आहेस. कारण तूं एकटाच भय रहित आहेस. तुझ्या ज्या भय रहित चरणांच्या आश्रयास माझे आजोबा प्रल्हाद आले आहेत तेच चरण तूं तिसऱ्या पाऊलाच्या निमित्ताने माझ्या मस्तकावर ठेव. आणि मला तुझ्या चरणी आश्रय दे!" असे बळीराजा म्हणाला आणि त्याच क्षणी भक्त प्रल्हाद त्या ठिकाणी प्रकट झाले व भगवंतास वंदन करून म्हणाले, " हे भगवंता तूं दिलेले बलीचे समृध्द इंद्रपद तूंच हिरावून घेतलेस हे फार चांगले केलेस. कारण स्वसामर्थ्य व ऐश्वर्यभोग यात बली अडकतच चालला होता. मनोनिग्रह केलेला, सत्यवचनी विवेकी पुरुषही कसा मोह पावतो याचे बली हे उत्तम उदाहरण आहे. त्याला आत्मतत्त्वाचे यथार्थ ज्ञान प्राप्त व्हावे हीच माझी सदिच्छा!" असे म्हणून प्रल्हाद हात जोडून उभा राहिला.

आपल्या पतीला वरुण पाशात बध्द झालेले पाहून विन्ध्यावली हात जोडून श्रीहरीला म्हणाली, " हे प्रभो! तूं स्वत:च्या क्रीडनासाठी निर्माण केलेल्या विश्वावर स्वामित्व गाजवण्याऱ्यांचा स्वकर्तृत्वा विषयीचा अभिमान तूं कसा हरण करतोस याचे हे उत्तम उदाहरण आहे. माझा आपणास त्रिवार नमस्कार आहे." असे म्हणून विन्ध्यावली अधिक काही बोलण्याच्या आत ब्रम्हदेव हात जोडून श्रीहरीला म्हणाले, " हे देवाधिदेवा! हा बलीराजा या दंडास पात्र नाही. कारण ह्याने उदार मनाने त्रैलोक्यासह आपले मस्तकही तुझ्या चरणी अर्पण केले आहे. भक्तांनी अर्पण केलेल्या तुलसिपत्रानेही संतुष्ट होणाऱ्या हे भगवंता, त्रैलोक्यासह मस्तक अर्पण केलेल्या बलीला हे क्लेश कां बरे प्राप्त व्हावेत?"

भगवान श्रीहरी म्हणाले, "ब्रम्हदेवा! भौतिकात रमलेल्या माझ्या धर्मनिष्ठ भक्तांवर मी जेंव्हा अनुग्रह करण्याची इच्छा करतो त्यावेळी त्याचे भौतिकातील सारे ऐश्वर्य तो त्याचे समजत असल्याने ते प्रथम हिरावून घेतो. कारण त्याच्याच मदाने उन्मत्त होऊन तो माझाच अपमान करू लागतो. पण बलीने सर्वच मोहांवर नियंत्रण ठेवून सत्य, पावित्र्य, दया व तप यांचा म्हणजेच पर्यायाने धर्माचा त्याग केलेला

नाही. माझी बलीवर पूर्ण कृपा आहे. म्हणून देवांनाही प्राप्त होणार नाही असे सुतालाचे विक्रमी वैभव असलेले स्थान मी त्याला देणार आहे. इतकेच नव्हे तर सावर्णी मन्वंतरात, माझ्या आश्रयाने इंद्रपद प्राप्त होईल.

श्रीहरी पूर्ण क्लेशमुक्त झालेल्या बलीकडे वळून म्हणाले, हे बले! तुझे कल्याण असो! तूं आतां आपल्या ज्ञातीबांधवांसह सुतलात प्रवेश कर. तिथे स्वर्गातही असणार नाही असे ऐश्वर्य माझ्या संरक्षणाखाली भोग. माझे सुदर्शनचक्र सदैव तुझ्या ऐश्वर्याचे संरक्षण करील. सर्वकाळ माझ्या दर्शनामुळे तुझा असुरी स्वभाव कधीच उद्भवणार नाही. भगवान श्रीहरी समोर हात जोडून व नतमस्तक होऊन बलीराजा म्हणाला, "हे देवाधिदेवा! तुला प्रणाम केल्याचा केवढा महिमा आहे ! मी केवळ बद्धावस्थेत नुसता नमस्कार करण्याचा प्रयत्न करताच इंद्रादी देवांनाही जी तुझी कृपा पूर्वी कधी लाभली नाही ती तूं मज असुरावर केली आहेस मी धन्य झालो. मी धन्य झालो! मी सदाचा आपला शरणागत आहे. आणि माझा आपणास सदैव नमस्कार असो!" असे म्हणून बलीने भगवान श्रीहरिला साष्टांग नमस्कार केला. मग ब्रम्हदेव, रुद्र, प्रल्हाद इत्यादींना नमस्कार केला. आणि शांत चित्ताने आपल्या सर्व असुरांसह बलीने सुतलात प्रवेश केला. वामन अवतार धारण करून श्रीहरीने अदितीचे मनोरथ पूर्ण केले. इंद्रास पुनश्च स्वर्ग मिळवून दिला आणि अदितीचे दु:ख दूर केले. त्यावेळी प्रल्हादाने श्रीहरीची स्तुति केली; " हे प्रभो! तुझे चरित्र खरोखरच अद्‌भुत आहे. अनाकलनीय आहे. तूं सर्वात्मा, सर्वज्ञ, समदृष्टी असून सर्वांवर सारखाच भाव ठेवणारा आहेस. असे असूनही तूं आपल्या सत्वगुणी सद्भक्तांचे विशेष प्रिय करतोस. माझा तुला सदैव नमस्कार असो."

भगवान श्रीहरी प्रल्हादास म्हणाले, "वत्सा प्रल्हादा! तुझे कल्याण असो! तूं आता नातवासह सुतलात आनंदाने राहून सर्वांना संतुष्ट कर. सुतलाच्या द्वारावर मी स्वत हातात गदा घेऊन नित्य उभा राहीन. त्यामुळे तुला नित्य माझे दर्शन घडेल व त्यामुळे तुला कर्मबंधन राहणार नाही." प्रल्हाद भगवान श्रीहरिला प्रदक्षिणा व नमस्कार करून सुतलात निघून गेला. मग यज्ञमंडपात बसलेल्या सर्व ऋत्विजांकडे कृपापूर्ण दृष्टी टाकून भगवान श्रीहरी शुक्राचार्यांना म्हणाले, " हे मुने! तूं आता बलीच्या यज्ञाची सांगता कर." तेंव्हा शुक्राचार्य म्हणाले, " हे भगवन्! ज्या बलीने सर्वस्व अर्पण करून साक्षात् यज्ञमूर्ती अशा तुझेच पूजन केले असल्यामुळे त्याच्या कर्मात वैगुण्य कोठून असणार? त्याहीपेक्षा हे भगवन्! कोणत्याही न्यूनतेमुळे उत्पन्न झालेले कर्मदोष केवळ तुझ्या नामसंकीर्तनाने नष्ट होतात. तथापि तुझी आज्ञा म्हणून मी हा यज्ञ पूर्ण करीन." बोलल्या प्रमाणे शुक्राचार्यांनी बलीचा यज्ञ पूर्ण केला. अद्‌भुत कर्म करणाऱ्या श्रीहरीचे हे वामन अवताराचे चरित्र श्रद्धा व भक्तीने पठण, श्रवण व मनन करतो त्याच्या कर्म दोषाची निवृत्ती होऊन अंती उत्कृष्ट गती प्राप्त होते.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

## ।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- आठवा स्कंध

## पुष्प ११० वे (अध्याय २४)

## भगवंताचा मत्स्यावतार

परीक्षित राजाला मत्स्यावताराचे रहस्य जाणून घेण्याची इच्छा झाली.

त्याची ती जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी शुकमुनी पुढे सांगू लागले, " हे राजा! ज्या प्रमाणे वायू लहान मोठ्या सर्व प्राण्यांमध्ये संचार करूनही स्वत: लहान वा मोठा होत नाही त्याचप्रमाणे बुद्धीच्या गुण योगाने लहान-मोठ्या, उत्कृष्ट-निकृष्ट, अशा सर्व भूतांमध्ये नियंत्रणाच्या रूपाने संचार करणारा ईश्वरही निर्गुण असल्यामुळे लहान-मोठा, उत्कृष्ट-निकृष्ट होत नाही. कोणत्याही प्रकारच्या अवतारात त्याचे सामर्थ्य परिपूर्ण असते.

निद्रा ही कालगतीने प्रत्येकालाच प्राप्त होते तशी ती ब्रम्हदेवांनाही होते. तेंव्हा कल्पाच्या अंती ब्रम्हदेव निद्रावस्थेत गेल्यावर ब्रम्हदेवाच्या मुखातून बाहेर पडलेले वेद जवळच असलेल्या हयग्रीव नामक दैत्याने पळवून नेले.

सर्वगामी, सर्वसाक्षी, सर्वव्यापी भगवंताच्या ते लक्षात आल्यावर त्याने मत्स्यरूप धारण केले. त्या कल्पात सत्यव्रत नामक महात्मा राजर्षी केवळ उदकपान करून तप करीत होता. त्यावेळी कृतमाला नदीच्या किनारी जलाने तर्पण करताना त्याच्या ओंजळीत एक छोटा मासा आला. सत्यव्रत त्याला परत नदीत सोडणार इतक्यात तो मासा मनुष्यवाणीने सत्याव्रताला म्हणाला, " हे दीन वत्सला! मला कृपया पुन्हा नदीत सोडू नकोस! मोठे जलचर मला खाऊन टाकतील.

सत्यव्रत आश्चर्य चकित झाला पण त्या मत्स्याला आपल्या कमंडलूत ठेवले. दुसऱ्या दिवशी राजाने पाहिले कीं मासा कमंडलूत मावत नाही. म्हणून त्याला आश्रमातल्या रांजणात ठेवले. तिथेही तो मुहूर्तभरात तीन हात मोठा झाला. म्हणून सत्यव्रताने त्याला जवळच्या सरोवरात सोडले. तर तिथेही सत्यव्रताचे आन्हिक होई पर्यंत तो सरोवरात मावेनासा झाला. मग त्या मत्स्याने सत्यव्रताला दुसरीकडे नेण्याची विनंती केली म्हणून सत्यव्रताने त्याला समुद्रात सोडण्यासाठी समुद्रा जवळ आणले.

तेंव्हा तो मत्स्य सत्यव्रताला म्हणाला, " हे वीर, तूं मला इथे सोडू नकोस. कारण समुद्रातले मोठे मासे अथवा मकरादी मोठे जलचर मला खाऊन टाकतील!" त्याच्या बोलण्याने मोहून गेलेला सत्यव्रत

म्हणाला, " मत्स्य रूपाने माझ्या मनाला मोह उत्पन्न करणारा तूं नक्की कोण आहेस? कारण मानवी वाणीने बोलणारा प्रभावी जलचर मी आजवर कधीच पाहिलेला नाही. अथवा ऐकलेला नाही. त्यामुळे तुझे खरे स्वरूप सांग! तूं क्षय रहित भगवंत तर नाहीस? आमच्या सारख्यांवर अनुग्रह करण्यासाठी तूं हे रूप धारण केले आहेस असेच मला वाटते. तसे असेल तर हे मत्स्यरूपी नारायणा माझा तुला नमस्कार असो. हे कमल नयना तूं हे मस्त्यरूप कां बरे धारण केले आहेस?"

सत्यव्रताचे हे बोलणे ऐकून मत्स्यावतारी भगवान श्रीहरी त्याला म्हणाले, " हे राजन्! आज पासून सातव्या दिवशी हे त्रैलोक्य प्रलय समुद्रात बुडू लागेल. त्यावेळी मी सोडलेली एक नौका तुझ्या जवळ येईल. त्यावेळी तूं सप्तर्षींसह सर्व औषधी बीजे व प्राणीमात्रांचा परिवार घेऊन या नौकेत चढ. प्रलय सागरात सूर्य असणार नाही. पण नौका सप्तर्षींच्या प्रभावामुळे प्रकाशित होईल. नौका विस्तीर्ण असल्यामुळे तूं निर्भयपणे संचार कर. प्रलय वायुमुळे नौका जेंव्हा हेलकावू लागेल त्यावेळी मी प्रचंड मोठ्या मत्स्यरूपाने येउन नौका स्थिर करीन. त्यावेळी वासुकी नामक सर्प नौकेत येईल. त्याच्या सहाय्याने तूं ती नौका माझ्या शिंगाला बांध. मग ब्रम्हदेवाची रात्र संपे पर्यंत मी तुझ्या नौकेसह प्रलय सागरात संचार करीन. त्यावेळी मी तुला ज्ञान प्रदान करीन. ते तुझ्या अंत:करणात ठसावेल." इतके सांगून मत्स्यरूप भगवान अदृश्य झाले.

सत्यव्रत सप्तऋषींकडे आला. व भगवंताने सांगितल्याप्रमाणे औषधीबीजे व असंख्य प्राणी घेऊन नौकेची वाट पाहू लागला. यथावकाश प्रलयकाळ आल्यावर सर्व जलमय झाले आणि एक नौका सत्यव्रता समोर आली. सर्वजण नौकेत आरूढ झाले. सप्तर्षींनी राजाला भगवंताचे ध्यान धरण्यास सांगितले.त्याप्रमाणे सत्यव्रताने ध्यान धरताच लक्ष योजने विस्ताराचा सोनेरीवर्णाचा मत्स्य तिथे आला. त्याने प्रथम नौका स्थिर केली. सत्यव्रताने वासुकीच्या सहाय्याने मत्स्यरूप भगवंताच्या शिंगाला ती विस्तीर्ण नौका बांधली. व श्रीहरीची स्तुति करू लागला. "हे भगवन्! अविद्येमुळे आमचे आत्मज्ञान आच्छादित झाले आहे. म्हणून हे मुक्तीदात्या भगवंता आम्हाला बोध करून आमच्या हृदयग्रंथी मोकळया कर!"

सत्यव्रताने मन:पूर्वक केलेल्या प्रार्थनेमुळे भगवान श्रीहरीने मत्स्यरुपात जलक्रीडा करताना सत्यव्रताला महत्तत्त्वाचा उपदेश केला. आत्मरहस्यरूप मत्स्य पुरणाची संहिता मत्स्यरूप श्रीहरीने राजा सत्यवताला सांगितली. हयग्रीवाचा वध करून आणलेले वेद मत्स्यरूप श्रीहरीने प्रलयाच्या समाप्ती नंतर ब्रम्हदेवास परत केले. शास्त्रज्ञान व प्रत्यक्ष ज्ञान झालेला सत्यव्रत राजा विवस्वानाचा पुत्र श्राद्धदेव म्हणून जन्माला आला व प्रलयानंतर वैवस्वत मनू होऊन वैवस्वत मन्वंतरास सुरुवात झाली. मत्स्यरूप भगवान श्रीहरी व सत्यव्रत यांच्या संवादाचे हे आख्यान ज्ञानदान करणारेआहे.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

इथे श्रीमद्भागवतातला आठवा स्कंध पूर्ण झाला. या स्कंधात एकूण २४ अध्याय व ८७० श्लोक आहेत. त्या सर्वांचा पुष्प १०१ ते पुष्प ११० हा साररूप अनुवाद आहे

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १११ वे (अध्याय १ पूर्ण २ चालू )

## वैवस्वत मन्वंतराची सुरुवात

द्रविड देशीच्या सत्यव्रत राजाचा इतिहास ऐकून परीक्षित राजाने वैवस्वत मन्वंतराचे वृत्त विचारले म्हणून शुकमुनी सांगू लागले. "राजन्! प्रथम वैवस्वतमनूचा वंश ऐक! प्रलया नंतर पुन्हा सृष्टी निर्माण झाली. श्रीहरीच्या नाभीतून कमलकोश, कमल कोशातून ब्रम्हदेव, ब्रम्हदेवांपासून मरीची, मरीचींपासून कश्यप. मग कश्यप व अदिती पासून विवस्वान. विवस्वानाला संज्ञेपासून श्राद्धदेव! हाच पूर्वकल्पाच्या शेवटी वर्णिलेला सत्यव्रत राजा होय. श्राध्ददेव विवस्वानाचा पुत्र म्हणून वैवस्वतमनू. वैवस्वतमनूचा विवाह श्रद्धेशी झाला. विवाहा नंतर बराच काल संतती न झाल्यामुळे वैवस्वताने वसिष्ठांच्या मार्गदर्शनाखाली पुत्र प्राप्ती साठी मित्र व वरुण यांना उद्देशून इष्टी केली. त्यावेळी श्रद्धा पयोव्रत करीत होती. तिने आहुती देताना होत्याला विनंती केली कीं मला मुलगी हवी आहे. त्यामुळे होत्याने तसा संकल्प उच्चारला. मनूला पहिली मुलगी झाली. श्रद्धेला खूपच आनंद झाला. तिने मुलीचे नाव 'इला' ठेवले. मुलगी झाल्याचे मनूला फारच आश्चर्य वाटले. व आपणास पुत्र हवा असल्याचे सांगूनही कन्या कशी झाली? असा प्रश्न त्याने आपले आजोबा वसिष्ठ यांना विचारला. वसिष्ठांनी अंतर्ज्ञानाने सर्व जाणून मनूला खरे काय घडले ते सांगितले. पण वसिष्ठांनी मनूच्या इच्छे प्रमाणे फळ मिळण्यासाठी आपल्या तपाच्या सामर्थ्याने श्रीहरीची प्रार्थना केली. श्रीहरीने त्या मुलीचे मुलात रुपांतर करून दिले. त्याचे नाव सुद्युम्न असे ठेवले.

पुढे सुद्युम्न मोठा झाल्यावर एकदा उत्तरेकडे इलावृत्तातल्या मेरुपर्वताच्या पायथ्याशी असलेल्या रम्य वनात मृगया करण्यास आपल्या अमात्यांसह शिरला. आणि चमत्कार असा झाला कीं सुद्युम्नासह सर्व स्त्रीरुपाला प्राप्त झाले. शिव-पार्वतीचे ते क्रीडा स्थान असल्याने पार्वतीच्या समाधानासाठी शिवांनी त्या उपवनाची तशी योजना केलेली होती. कारण एकदा शिव-पार्वती क्रीडा करीत असताना काही मुनी शिवदर्शनास त्या वनात गेले. मृडानी विवस्त्र होती. घाई घाईने तिने वस्त्रे परिधान केली पण ती तीव्र खट्टू झाली. म्हणून शिवांनी त्या वनात प्रवेशणारे कोणीही स्त्रीरुपास प्राप्त होईल अशी योजना केली. त्यामुळे राजा सुद्युम्न व त्याचे अमात्य व इतर सर्व सैनिक स्त्री रुपास प्राप्त झाले.

त्याच वेळी बुध यांना स्त्री रूप प्राप्त झालेला सुद्युम्न दिसला. त्यांच्या पहिल्या भेटीतच दोघेही एकमेकांवर आसक्त झाले. सोमपुत्र बुधाला तिने आपला पती म्हणून वरले. बुधा पासून तिला पुरुरवा नामक पुत्र झाला. पुढे कालांतराने स्त्री रूप प्राप्त झालेला सुद्युम्न कुलाचार्य वसिष्ठांच्या पुढ्यात आला. तेंव्हा वसिष्ठांनी सर्व प्रकार जाणला व सुद्युम्नाला पुनश्च पुरुषरूप प्राप्त व्हावे म्हणून शिवोपासना केली.

शिवांनी सुद्युम्नाच्या बाबतीत तडजोड केली व सुद्युम्न एक महिना स्त्री व एक महिना पुरुष म्हणून वावरू लागला. पण जनतेला ते मानवले नाही. कालांतराने सुद्युम्नाने पुरुरव्याला राज्यावर बसवून आपण तपासाठी वन गमन केले. सुद्युम्नाने वनगमन केल्यावर वैवस्वत मनूने पुत्र प्राप्तीसाठी यमुनातीरी पुन्हा शतवर्षे तप केले. तेंव्हा श्रीहरीच्या वराने त्याला इक्ष्वाकू, नृग, शर्याती, दिष्ट, धृष्ट, करुषक, नरिष्यंत, पृषध्र, नभग, व कवी असे दहा पुत्र झाले. इक्ष्वाकू सर्वात थोरला. या दहा पुत्रांपैकी पृषध्राला गायी राखण्याचे काम दिले पण रात्रीच्या अंधारात वाघ आल्याचे जाणून तो वाघाला मारावयास गेला. पण वाघाने घाव चुकवून पळ काढला व चुकलेला घाव गाईला लागून ती गतप्राण झाली.

आपल्या हातून गो हत्या घडल्याने व वसिष्ठांनी जातीबाह्य केल्यामुळे पृषध्र सर्वसंग परित्याग करून वनात गेला व रानवणव्यात देह त्यागून मुक्त झाला. सर्वात धाकटा कवी बालवयातच विरक्त झाला. श्रीहरी चरणी लय लावून त्याने मुक्ती प्राप्त करून घेतली. करुषाचा कारुष नावाचा क्षत्रियवंश झाला. ते उत्तरेकडे राजे झाले. धृष्ट नामक पुत्रा पासून धार्ष्ट हे ब्राम्हण घराणे उदयास आले. नृगाचा पुत्र सुमती. त्याचा वंश चालू राहिला.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११२ वे (अध्याय २ पूर्ण)

### वैवस्वत मनूची संतती व सुकन्या-च्यवन कथा

नरिष्यंताच्या वंशात नरिष्यंतापासून दहाव्या पिढीत देवदत्त नामक भगवद्भक्तझाला. त्याला अग्निवेश नामक भगवान अग्निनारायणाचा अवतार असलेला पुत्र झाला. त्याच्या तपोबलाने 'अग्निवेशायन' ब्राम्हण घराणे स्थापन झाले.

दिष्ट्याच्या चवदाव्या पिढीत मरुत नामक महापराक्रमी राजा झाला. त्याच्या यज्ञयागाने इंद्राला मिळालेल्या सोमपानाने इंद्र धुंद झाला होता. व मिळालेल्या दक्षिणेमुळे ऋत्विजही धुंद झाले होते. याच्याच पिढीत पुढे तृणबिंदू नामक राजा झाला त्याला अलम्बुषा नामक अप्सरेपासून अनेक पुत्र व इडविडा नामक कन्या झाली. ह्याच कन्येचा विवाह विश्रवाशी झाला. त्याना कुबेर नामक पुत्र झाला.

मनूचा पुत्र शर्याती हा सर्वोत्तम ज्ञाता राजा होता. त्याला सुकन्या नावाची एक कन्या होती. ती खूप सुंदर होती व शर्यातीची लाडकी होती. शर्याती सुकन्येला घेऊन एकदा च्यवनमुनींच्या आश्रमात गेला होता. त्यावेळी वन शोभा पहात असताना सुकन्येने एका वारुळात शेजारी शेजारी काहीतरी चमकताना पहिले. तिने मणी समजून दोन काड्या घेऊन ते दोन्ही मणी काढण्याचा प्रयत्न केला. तेंव्हा त्या भोकातून रक्त प्रवाह बाहेर येऊ लागला. त्याबरोबर राजाच्या सैनिकांचे मलमूत्र बंद होऊन अत्यंत त्रास होऊ लागला. राजा ज्ञानी असल्याने त्याने सैनिकांना विचारले कीं कोणी च्यवनमुनींचा काही अपराध केला आहे कां? हे ऐकून सुकन्येने आपले कृत्य सांगून टाकले. राजाने त्वरित वारुळाची माती बाजूला केली. आत असलेल्या च्यवनमुनींच्या चरणी मस्तक नमवून सुकन्येच्या अपराधाची क्षमा मागितली. त्यावेळी दोन्ही डोळे गेलेल्या मुनींचा आशय जाणून शर्यातीने कन्यादान करून सुकन्येला त्यांची भार्या म्हणून त्यांच्या सुपूर्त केले. त्यामुळे च्यवनमुनी प्रसन्न झाले व सर्व सैनिक पूर्ववत झाले.

राजा शर्याती राजधानीकडे निघून गेला. सुकन्या स्वत:च्या अपराधाचे प्रायश्चित्त समजून च्यवनमुनींची मनोभावे सेवा करू लागली. च्यवनमुनींच्या मनातले जाणून त्याप्रमाणे वागण्याचे कठीण व्रतच जणू तिने घेतले. तिच्या अप्रतिम सेवेमुळे च्यवनमुनी तिच्यावर अत्यंत प्रसन्न झाले.

असाच काही काल लोटला. आणि एक दिवस अश्विनीकुमार च्यवनमुनींच्या आश्रमात आले. त्यांचे यथायोग्य स्वागत करून च्यवनमुनी त्या दोघांना म्हणाले, " देवहो! तुम्ही मोठे समर्थ वैद्य आहात. माझी पत्नी तरुण आहे आणि मी म्हातारा आहे. तरी स्त्रियांना प्रिय असणारे तारुण्य, सुंदर रूप व दृष्टी तुम्ही मला प्राप्त करून द्या मी तुम्हाला यज्ञातल्या सोमपानाचे अधिकार प्राप्त करून देईन. कारण तुम्ही देव असूनही तुम्हाला यज्ञातल्या सोमपानाचा अधिकार नाही.

अश्विनी कुमारांनी ते लगेच मान्य केले. त्यांनी जराग्रस्त व सर्वांगावर सुरकुत्या पडलेल्या च्यवनमुनिना व सुकन्येला आपल्या बरोबर घेतले. व एका सिद्ध पुरुषाने निर्माण केलेल्या सरोवरा जवळ आणले. सुकन्येला काठावर उभे करून त्या तिघांनीही सरोवरात बुडी मारली. थोड्या वेळाने सरोवरातून बाहेर आल्यावर तिघेही अत्यंत सुंदर, तरुण व सारखेच दिसत होते. सुकन्या आश्चर्यचकित झाली. तिला आपला पती ओळखता येईना. मग अश्विनीकुमारांनी तिला च्यवनमुनींच्या स्वाधीन केले व आपण आपल्या स्थानी निघून गेले. पुढे एकदा यज्ञ करण्याच्या संकल्पाने राजा शर्याती च्यवनमुनींना भेटायला त्यांच्या आश्रमात आला. त्यावेळी सुकन्या एका तेजस्वी तरुण व सुंदर युवकाशी प्रेमालाप करताना त्याला दिसली. सुकन्येने उठून पटकन आपल्या पित्याला अभिवादन केले. तेंव्हा राजा शर्यती उद्वेगाने म्हणाला, " कार्टे! तूं हे काय आरंभले आहेस? वार्धक्याने पिडीत अंध पतीला फसवून तूं ह्या जाराच्या भजनी लागून आपल्या कुळाला काळिमा फासत आहेस. वर मला नमस्कार करून आशीर्वादाची अपेक्षा करीत आहेस? काय हा निर्लज्यपणा आहे." तेंव्हा हसून सुकन्येने सगळा वृत्तांत सांगून पित्याची शंका दूर केली. राजा शर्यातीने तोंडभरून सुकन्येला आशिर्वाद दिले. राजाने च्यवनमुनींचे यथोचित पूजन करून सोमयाग करण्याचा मनोदय व्यक्त केला. च्यवनमुनींनी तो मान्य केला. राजा साठी केलेल्या सोमयागात च्यवनमुनींनी आपल्या सामर्थ्याने अश्विनीकुमारांना सोमपानाचा अधिकार दिला. त्यामुळे इंद्र संतापला. त्याने च्यवनमुनींवर वज्र उगारले. च्यवनमुनींनी आपल्या सामर्थ्याने इंद्राचा उगारलेला हात स्तंभित करताच इंद्राने सर्वदेवांसह अश्विनीकुमारांचा सोमपानाचा अधिकार मान्य करून स्वत:ची सुटका करून घेतली.

अश्विनीकुमार वैद्य असल्यामुळे देवांनी त्यांना सोमपानाच्या अधिकारातून वगळले होते. पण च्यवनमुनींनी तो अधिकार त्यांना प्राप्त करून दिला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११३ वे (अध्याय ३ पूर्ण ४ चालू)

## कुकुद्मी व नाभाग

राजा शर्यातीला सुकन्ये खेरीज उत्तानबर्ही, आनर्त, भूरिषेण असे तीन पुत्र होते. आनर्ताला रेवत नावाचा अति पराक्रमी पुत्र झाला. त्याने समुद्रात कुशस्थली नावाची नगरी स्थापन केली. त्या नगरीत राहूनच त्याने अनर्तादी राज्याचा कारभार केला. त्याला शंभर पुत्र झाले.

सर्वात थोरला कुकुद्मी. कुकुद्मीला रेवती नावाची कन्या होती. ती उपवर झाली. म्हणून तिला कोणता वर योजावा हे विचारण्यासाठी तो तिला घेऊन ब्रम्हदेवांच्या दरबारी आला. त्यावेळी ब्रम्हदेव गायन ऐकण्यात मग्न झाले होते. त्यामुळे कुकुद्मिला गायन संपे पर्यंत वाट पहावी लागली. गायन संपल्यावर त्याने ब्रम्हदेवांना वंदन करून आपले मनोगत सांगितले. ते ऐकून ब्रम्हदेव हसून म्हणाले, " कुकुद्मे, मी रेवतीसाठी निश्चित केलेल्या वरांपैकी आता एकही शिल्लक नाही. इतकेच नाही तर तूं इथे येण्यास निघाल्या पासून पृथ्वीवर चार युगांच्या सत्तावीस फेऱ्या होऊन गेल्या आहेत. तूं आता त्वरित परत जा. तूं जाई पर्यंत भगवान बलराम विद्यमान असतील. त्यांना तूं आपली कन्या अर्पण कर.

ब्रम्हदेवांना नमस्कार करून कुकुद्मी रेवतीला घेऊन त्वरित बलरामांकडे आला. आपली कन्या रेवती बलरामांना अर्पण करून स्वत: बद्रिकाश्रमात नर-नारायणांच्या सेवेसाठी निघून गेला. वैवस्वत मनूच्या नभग नावाच्या पुत्राला नाभाग नावाचा पुत्र होता. तो गुरुगृही विद्यार्जना साठी गेला असताना त्याच्या भावांनी संगनमताने पित्याची सर्व संपत्ती आपसात वाटून घेतली. नाभागासाठी काहीच ठेवले नाही. विद्याभ्यास पूर्ण करून नाभाग परत आल्यावर आपला भाग मागू लागला. तेंव्हा त्याचे भाऊ म्हणाले तुझ्या वाटणीचे वडील ठेवलेत. हे ऐकून सरळ अंत:कारणाचा नाभाग वडिलांकडे आला. वडिलांना म्हणाला, "माझ्या भावांनी माझ्या वाटणीचे म्हणून तुम्हाला दिले आहे."

हे ऐकून नभग म्हणाले, "बाळा नाभागा! द्रव्याधिष्ठीत संसारासाठी तुला माझा काही उपयोग होणार नाही. त्यामुळे तुला मी तुझ्या निर्वाहाचा उपाय सांगतो. तूं अंगिरस ऋषींच्या आश्रमात जा! ते

सध्या 'द्वादेशाह' नामक सत्र, स्वर्ग प्राप्तीसाठी करीत आहेत. ते विद्वान असूनही षडाह आवृत्तीच्या वेळी घोटाळयात पडतात. तूं सूज्ञ आहेस. ते घोटाळयात पडल्यावर त्यांना 'इदमित्सा' व 'यज्ञेन' ही दोन सूक्ते सांग. म्हणजे कर्म समाप्तीच्या वेळी स्वर्गारोहण करताना ते यज्ञातील शिल्लक द्रव्य तुला देतील. ते प्रचंड असेल. नाभागाने पित्याला वंदन करून अंगिरस ऋषींच्या आश्रमात गमन केले व त्यांनी सांगितल्या प्रमाणे केले.यज्ञाची सांगता झाल्यावर अंगिरस ऋषींनी यज्ञस्थानी उरलेले सर्व द्रव्य नाभागाला दिले. व स्वत: स्वर्गात निघून गेले. नाभाग द्रव्य घेऊन जाणार इतक्यात तिथे एक काळाभोर पुरुष आला व तो नाभागाला म्हणाला, " यज्ञस्थानी राहिलेला सर्व द्रव्यभाग माझा आहे." तेंव्हा नाभागाने अंगिरसऋषींनी आपल्याला दिला असल्याचे सांगितले. तेंव्हा तो पुरुष म्हणाला हा वाद असा मिटणार नाही. त्यामुळे तूं आपल्या पित्याकडे जा व त्याला सांग कीं यज्ञातील उर्वरित सर्व द्रव्य ऋषींनी मला दिले खरे पण त्यावर रुद्र आपला हक्क सांगत आहे. तेंव्हा मी काय करू? हे ऐकून तुझा पिता जो निर्णय देईल तो मी मान्य करीन!" नाभाग लगेच पित्याकडे आला व घडलेले वृत्त सांगितले. नभग म्हणाला, " बाळा! रुद्र जे म्हणाला ते अगदी खरे आहे."

पित्याने दिलेला निर्णय नाभागाने जसाच्या तसा रुद्राला कथन केला. वंदन करून घडल्या अपराधाची क्षमा मागितली. नाभागाच्या या प्रामाणिक वर्तनाने भगवान रुद्र एकदम प्रसन्न झाले. भगवान रुद्र नाभागाला म्हणाले, " हे नाभागा! तुझ्या सत्यनिष्ठ पित्याने निस्पृहतेने जो काही निर्णय दिला तो तूं शिरोधार्य मानलास त्या तुझ्या खरेपणावर प्रसन्न होऊन हे सर्व द्रव्य मी तुला देत आहे. तुला मंत्रज्ञान आहेच, पण त्याव्यतिरिक्त मी तुला ब्रम्हज्ञान देतो. असे म्हणून भगवान शिवांनी नाभागात ब्रम्हज्ञान संक्रमित केले. नाभागाला आशीर्वाद देऊन आपण अंतर्धान पावले. नाभागाचे हे आख्यान रोज सकाळ संध्याकाळ पठण व मनन करण्याने भगवान शिवकृपेने मंत्र व ज्ञान यांचा लाभ होतो.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११४ वे (अध्याय ४ व ५ पूर्ण)

# राजा अंबरीष

शुक मुनी पुढे सांगू लागले, " ह्याच नाभागचा पुत्र अंबरीष!

अंबरीष हा अत्यंत वैभवशाली ऐश्वर्य संपन्न सम्राट राजा, ज्ञानी असून निरासक्त व महान् भगवद्भक्त होता. त्याची भगवद्भक्ती इतकी प्रखर होती कीं कधीही विफल न होणारा ब्राम्हणाचा शापही त्याला बाधू शकला नाही. मन, वाणी, चित्त, वित्त हे सर्व श्रीहरीचे असून श्रीहरीचाच राज्यकारभार आहे. अशा भावनेने तो राज्य करीत होता. वेगळेपणाने आपले वैभव दाखवण्याची राजे लोकंची पध्दत असते पण अंबरीष स्वत:ला प्रजेपेक्षा वेगळा समजत नसल्यामुळे प्रजाजानांपेक्षा वेगळा पोशाख तो करीत नसे. अंबरीषाने एकदा ईश्वराच्या आराधनेसाठी पत्नीसह वर्षभराचे साधन द्वादशी व्रत अंगिकारले. त्या व्रताच्या समाप्तीच्या वेळी नवमी पासून त्रिरात्र उपोषण केले. द्वादशीला पहाटेच यमुना स्नान करून यथाविधी श्रीहरीचे पूजन केले. विद्वान भगवद्भक्तांचे पूजन केले. त्यांना षड्रसपक्वान्नाचे भोजन दिले. लहान वयाच्या धष्टपुष्ट गाईंचे सालंकृत दान केले.

संतुष्ट झालेल्या ब्राम्हणाचे आशीर्वाद घेऊन द्वादशीचे पारणे करणार तेवढ्यात दुर्वासमुनी तिथे प्रवेशले. अंबरीषाने त्यांचेही यथोचित स्वागत व पूजन करून त्यांना भोजनाची प्रार्थना केली. दुर्वासमुनींनी प्रार्थना स्वीकारली. पण आन्हिक आटोपून येतो असे म्हणाले. अंबरीषाने द्वादशीचे पारणे सोडण्यास फक्त एक घटिका शिल्लक असल्याने कृपया लवकर या अशी प्रार्थना केली. हो म्हणून दुर्वास कालिंदीनदीवर गेले पण घटिका संपत आली तरी परत येण्याचे लक्षण दिसेना. अंबरीषाने व्रतभंग होऊ नये म्हणून विद्वानांच्या मताने दुर्वासांच्या आधी भोजन न करता विष्णुपादोदकतीर्थ घेऊन पारणा सोडला व साधन द्वादशी साधली. मग दुर्वासांची वाट पहात बसला.

काही वेळाने आन्हिक आटोपून दुर्वासमुनी आले. आणि राजा अंबरीषाने तीर्थोदक घेऊन पारणा सोडल्याचे समजल्यावर संतापले. अतिथीच्या आधी पारणा सोडून अतिथीचा अपमान केला असे वाटून दुर्वासांनी आपल्या जटेतून एक केस उपटला. त्या केसापासून अग्नीप्रमाणे तेजस्वी कृत्या तयार केली. आणि

अंबरीषाला भस्म करण्याच्या उद्देशाने त्याच्यावर सोडली. राजा अत्यंत निर्भयतेने विष्णुस्मरणात शांत उभा राहिला. इतक्यात भगवान श्रीकृष्णांच्या सुदर्शन चक्राने ती कृत्या जाळून टाकली व ते चक्र दुर्वासांच्या रोखाने निघाले. ते पाहून दुर्वास घाबरून पळू लागले. पण प्राण वाचवण्यास त्यांना त्रिभुवनात कुठेही जागा मिळाली नाही. म्हणून ब्रम्हदेवांना शरण गेले. ब्रम्हदेवांनी असमर्थता व्यक्त केली. म्हणून कैलासात भगवान शिवांकडे गेले. त्यांनीही असमर्थता व्यक्त केल्यावर वैकुंठात श्रीहरीकडे गेले.

श्रीहरी म्हणाले, " मी भक्तांच्या आधीन आहे. मला स्वत:ला सुख-दु:ख, प्रिय-अप्रिय असे काही नसले तरी गृह, पुत्र, दारा, राज्य, वैभव इत्यादींचा अभिमान व आसक्ती नसलेल्या माझ्या भक्तांचा अपराध झाला कीं मी परतंत्र होतो. त्यामुळे हे दुर्वासमुने तुला जर हे संकट टाळावयाचे असेल तर ज्याच्या छळामुळे तुझ्यावर हे संकट ओढवले आहे त्या अंबरीषाकडे जाऊन त्याची क्षमा माग. अरे तप आणि विद्या या दोन्ही गोष्टी ब्राम्हणांना मोक्ष देणाऱ्या आहेत खऱ्या. पण दुराचारी ब्राम्हणांना त्या अशा अनर्थकारी होतात." सुदर्शन चक्राच्या भयाने दु:खी झालेले दुर्वास त्वरित अंबरीषाकडे आले. अंबरीषाचे पाय धरून त्याची क्षमा मागितली. दुर्वासा सारख्या श्रेष्ठ ब्राम्हणाने आपले पाय धरले म्हणून अंबरीषाला वाईट वाटले. त्याने भगवान श्रीहरीचा धावा केला. सुदर्शन चक्राला नमस्कार केला व प्रार्थना केली " हे सुदर्शना! तूं धर्माचा आधार आहेस! त्रैलोक्याचा रक्षणकर्ता आहेस. तुझे तेज, सामर्थ्य, वेग व पराक्रम अतर्क्य व अतुलनीय आहे. माझा तुला वारंवार नमस्कार आहे. हे सुदर्शना, मी जर स्वधर्माचरण केले असेल, निष्काम ईश्वरभक्ती केली असेल, सर्वाभूती परमेश्वर असल्याची माझी दृढ भावना प्रामाणिक असेल तर हे दुर्वासमुनी निश्चिंत होऊ दे. तूं आमच्या कुलाच्या उत्कर्षा करिता या विप्रवराचे रक्षण कर."

अंबरीषाच्या प्रार्थनेने सुदर्शनचक्र शांत झाले. भयमुक्त दुर्वासमुनी म्हणाले, " अंबरीषा! तूं अत्यंत थोर आहेस. भगवान श्रीकृष्णाला आपलासा केलेल्या महात्म्यांना कोणतीच गोष्ट अशक्य नाही. माझ्या अपराधाकडे दुर्लक्ष करून तूं माझे प्राण वाचवले आहेस. हे तुझे माझ्यावर महान उपकार आहेत." दुर्वासमुनी सुदर्शनचक्र पाठी लागल्यामुळे तिथून पळाले. हे अंबरीषाला समजले नव्हते. ते आत्ता येतील मग येतील अशा अवस्थेत राजा उदकपान करून वर्षभर त्यांची वाट पहात थांबला होता. दुर्वासमुनी शांत होताच राजाने त्यांचे पूजन करून प्रथम त्यांना भोजनास बसविले. त्यानंतर दुर्वासांच्या परवानगीने राजाने भोजन केले. दुर्वासांनी आपली सगळी हकीकत अंबरीषाला सांगितली. दुर्वासांनी राजाला आशीर्वाद दिला कीं हे राजा स्वर्ग व पृथ्वी दोन्ही ठिकाणी तुझी कीर्ती गायली जाईल. सर्व गोष्ट कळल्यावर राजा विचार करू लागला, कीं परमेश्वराचे सामर्थ्य अतर्क्य आहे. त्याच्या प्रभावानेच आपले रक्षण होत आहे. त्यामुळे आता त्यालाच सारसर्वस्व वाहाण्यातच आपले परम कल्याण आहे. हे जाणून राजाने आपल्या पुत्रावर राज्य सोपविले. आपण विरक्त होऊन तपाचरणासाठी वनात निघून गेला व अंत:करण श्रीहरीचरणी लीन करून ब्रम्हरूप झाला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११५ वे (अध्याय ६ पूर्ण)

## मांधाता व सौभरी कथा

शुकमुनी पुढे सांगू लागले, " राजन्! वैवस्वत मनूच्या इक्ष्वाकू नामक पुत्राला शंभर पुत्र झाले. त्यातील विकुक्षी, निमी व दंडक हे तीन वडील पुत्र. इक्ष्वाकूने वसिष्ठांकडून ब्रम्हज्ञान प्राप्त करून घेतले व मुक्त झाला तेंव्हा विकुक्षीला राज्य दिले गेले. विकुक्षीने उत्तम राज्य तर केलेच पण भगवद्भक्तिने श्रीहरीलाही प्रसन्न करून घेतले. पुढे कृतयुगाच्या संधीकाळात त्याचा पुत्र पुरंजय राजा झाला. पुरंजय महासमर्थ व विष्णुभक्त होता. त्याच्या पराक्रमावर मोहून देवांनी दैत्य निर्दालनासाठी त्याचे सहाय्य मागितले. तेंव्हा इंद्र जर माझे वाहान होणार असेल तर मी तुमचे सेनापतीपद भूषवीन अशी अट पुरंजयाने घातली. इंद्राने भगवान विष्णुंना साकडे घातले. भगवान विष्णुंनी इंद्राला वृषभरूपाने पुरंजयचे वाहान होण्याचा सल्ला दिला व इंद्राने तो मानला. पुरंजय जेंव्हा महाकाय वृषभरूप इंद्रावर आरूढ झाला तेंव्हा भगवान श्रीविष्णुंच्या कृपेने पुरंजयाचे तेज अफाट वाढले. त्यावेळी पुरंजयाचा अफाट पराक्रम पाहून उरलेले दैत्य आपले प्राण वाचवण्यासाठी रणभूमी सोडून पळून गेले. मग पुरंजयाने नि:स्वार्थ बुद्धीने इंद्राचे राज्य सुरक्षित करून त्याच्या ताब्यात दिले. त्यामुळे पुरंजयाच्या कुलावर इंद्राची कृपा राहिली.

पुरंजयापासून सतराव्या पिढीत युवनाश्व नावाचा राजा झाला. त्याला संतती नसल्यामुळे औदासीन्याने तो वनात निघून गेला. त्याच्या शंभर स्त्रियाही त्याच्या मागोमाग गेल्या. वनातल्या ऋषींनी दया येऊन राजासाठी ऐन्द्री इष्टी सुरु केली. इष्टी चालू असता एका मध्यरात्री राजा युवनाश्वाला तहान लागली. यज्ञमंडपात सर्व ब्राम्हण दमून गाढ झोपले होते. राजाला पाणी देण्यास कोणीच नव्हते. राजाला यज्ञवेदी जवळ एक पाण्याचा तांब्या दिसला. त्या तांब्यातले पाणी मंतरलेले होते. राजाला काही माहित नव्हते. त्याने ते पिऊन टाकले. दुसऱ्या दिवशी ऋत्विजांना अभिमंत्रून ठेवलेला कलश रिकामा कसा काय झाला हा मोठा प्रश्न पडला. चौकशी करता पुत्रोत्पत्तीसाठी मंत्रून ठेवलेले पाणी राजा स्वत:च प्याला असे समजल्यावर ते हतबुध्द झाले. दैवगतीचे सामर्थ्य असे जाणून गप्प राहिले. त्या मंतरलेल्या जलाच्या प्रभावाने राजाच्या पोटात गर्भ वाढू लागला.

कालांतराने योग्यवेळी युवनाश्वाची उजवीकूस फोडून तो गर्भ चक्रवर्ती लक्षणयुक्त बालकाच्या रुपात बाहेर पडला. त्यावेळी सर्व ऋत्विज ईश्वराची प्रार्थना करीत होते. ईश्वरकृपेने युवनाश्व सुखरूप राहून हे सर्व पार पडले. पण आता या बाळाला पाजणार कोण? त्यावेळी पुरंजयाच्या पराक्रमामुळे त्या कुलाचा परम मित्र झालेला इंद्र तिथे प्रकट झाला व "मांधाता" म्हणजे मला पिईल असे म्हणून इंद्राने आपली अमृत स्त्रवणारी तर्जनी त्याच्या मुखात घातली. इंद्र मांधाता असे म्हणाला म्हणून त्या बालकाचे नाव "मांधाता" असे ठेवले गेले.

कालांतराने मांधाता स्वपराक्रमाने चक्रवर्ती राजा झाला. संपूर्ण पृथ्वीचे राज्य तो करू लागला. त्याला पुरुकुत्स, अंबरीष व मुचकुंद असे तीन पुत्र व पन्नास अतिसुंदर कन्या झाल्या. मांधात्याच्या राजधानी जवळच यमुना तीरी आश्रमाची स्थापना करून सौभरीमुनी तपाचरण करीत होते. एकदा आन्हिक करताना त्यांना एक मत्स्य आपल्या मादी बरोबर विषयसुखाचा आनंद उपभोगताना दिसला. तेंव्हा सौभरीमुनींना विषयभोगाची इच्छा झाली. सौभरीमुनी मांधात्याकडे त्याच्या पन्नास मुलींपैकी एका मुलीची मागणी करण्यास आले. जराग्रस्त व वृध्द तपस्व्याला नकार कसा द्यावयाचा? असा प्रश्न मांधात्याला पडला. त्यामुळे मांधात्याने युक्ती केली. तो म्हणाला, “हे मुने! माझ्या पन्नास मुलींपैकी जी मुलगी आपण होऊन तुम्हाला पसंत करील तिला आपण सुखेनैव घेऊन जा!’ असे म्हणून सौभरींना द्वारपालाच्या मागोमाग जाण्यास विनवले. आपण जराजर्जर असल्यामुळे राजाने केलेली ही युक्ती सौभरींच्या लक्षात आली. त्यांनी द्वारपालाच्या मागून जाता जाता अप्सरांनाही मोह उत्पन्न होईल असे तेजस्वी तरुणाचे रूप घेतले. पित्याने ज्या कारणासाठी सौभरींना पाठवले ते जाणून सर्व मुली त्यांच्यावर भाळल्या व सर्वच मुलींनी त्यांना वरले. मांधात्याचा नाईलाज झाला. आपल्या राजकन्यांचा संसार ह्या जराग्रस्त ऋषींच्या बरोबर कसा होणार ही चिंता मांधात्याला होतीच. त्यामुळे एकदा त्यांचा संसार पाहून यावा या उद्देशाने राजा सौभरींच्या आश्रमात गेला. आश्रमाच्या प्रवेशद्वारीच राजाचे अभूतपूर्व वैभवाने स्वागत झाले. राजवाड्यात नव्हत्या इतक्या सुविधा त्या आश्रमात होत्या. त्या स्वर्गीय वैभवाने समृध्द असलेल्या आश्रमात राजाच्या सर्व कन्या सौभरींशी समरस झालेल्या पाहून व सौभरींचे योग सामर्थ्य पाहून मांधात्याचा सगळा अभिमान गळून पडला व तो निरभिमान होऊन परत गेला.

दीर्घकाळ विषयसुख भोगूनही सौभरींचे समाधान होईना! तेंव्हा आपण स्वेच्छेनच कुठेतरी थांबले पाहिजे हे लक्षात येऊन सौभरींनी त्याच क्षणी सर्व वैभवासह राजकन्यांचा त्याग केला व वनगमन केले. त्या पन्नास राजकन्याही त्यांच्या पाठोपाठ वनात गेल्या व सौभरींसह परमपदी गेल्या.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

### ।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११६ वे (अध्याय ७ पूर्ण व ८ चालू)

# राजा हरिश्चंद्र व राजा सगर

मांधात्या नंतर पुरुकुत्स राजा झाला.

पुरुकुत्स विष्णुभक्त होता. आपल्या तपाचरणाने त्याने दिव्यशक्ती प्राप्त करून घेतली होती. नागकन्या नर्मदेशी त्याचा विवाह झाला. नर्मदेच्या पित्याने म्हणजे नागराजाने पुरुकुत्साची दिव्यविष्णुशक्ती जाणून त्याला आपल्या मदतीस बोलावले. गंधर्व हे नागांचे शत्रू असल्यामुळे ते नागांना त्रास देत असत. पुरुकुत्साने आपल्या दिव्य शक्तीने त्यांचा पूर्ण नि:पात केला. त्यामुळे प्रसन्न होऊन नागराजाने पुरुकुत्साला वर दिला कीं जो कोणी तुझ्या या पराक्रमाचे स्मरण करील त्याला सर्प भय असणार नाही. पुरुकुत्सा पासून सातव्या पिढीत सत्यव्रत राजा झाला.

सत्यव्रताचा पुत्र हरिश्चंद्र. सत्यव्रता नंतर हरिश्चंद्र राजा झाला. त्याला संतती होईना. तेंव्हा हरिश्चंद्राने नारदांच्या उपदेशाने वरुणाची प्रार्थना केली. वरुण प्रसन्न झाल्यावर हरिश्चंद्राने मला जो पुत्र होईल त्याने मी तुझे यजन करीन. असे आश्वासन हरिश्चंद्राने वरुणाला दिले. वरुणाने 'तथास्तु' म्हटले. पुढे योग्य समयी हरिश्चंद्राला पुत्र प्राप्ती झाली. त्याचे नाव रोहित ठेवले. राजाला पुत्र झाल्यावर वरुणदेव प्रकट होऊन "तूं मला दिलेल्या वचना प्रमाणे पुत्राचा बळी देऊन माझे यजन कर!" अशी हरिश्चंद्राकडे मागणी केली. तेंव्हा अर्थाचा अनर्थ झाल्यामुळे राजा हरिश्चंद्र चक्रावून गेला. त्यावेळी हरिश्चंद्राने आपला पुत्र अद्याप दहा दिवसांचाही झालेला नाही अशी सबब सांगून ती वेळ टाळली. दहा दिवसांनी जेंव्हा वरुणदेव परत आला तेंव्हा दांत येई पर्यंतचा अवधी मागून घेतला.

असे करता करता रोहित मोठा झाला व त्याला समजले कीं वरुणदेवाला यज्ञात आपला बळी हवा आहे. म्हणून रोहित गुपचूप पळून गेला. त्यामुळे संतापलेल्या वरुणदेवाने हरिश्चंद्राला उदरव्यथा निर्माण केली. कर्णोपकर्णी रोहितला आपल्या पित्याची व्यथा समजली. त्याला वाईट वाटले व तो पित्यासाठी परत येण्यास निघाला. त्या कुलावर इंद्राची कृपा असल्यामुळे इंद्राने ब्राम्हणाच्या रूपाने रोहितची वाटेतच भेट घेऊन तीर्थ यात्रेच्या निमित्ताने परत जाण्यापासून पांच सहा वेळा परावृत्त केले. तेवढ्या काळात रोहित चांगलाच समजदार झाला. वरुणाने नरमेधाचा आग्रह धरल्यामुळे रोहितने युक्ती केली. घरी परत जाताना

रोहित अजिगर्त ऋषींच्या आश्रमात मुकामाला गेला. त्या ऋषींचा मधला मुलगा शुन:शेपाला रोहितने अजिगर्त ऋषींना भरपूर द्रव्य देऊन नरमेधासाठी  विकत घेतला आणि घरी आला. आपल्या ऐवजी शुन:शेपाची योजना करून नरमेध करण्याचा प्रस्ताव पित्यासमोर ठेवला.

हरिश्चंद्राने जमदग्नी अध्वर्यू, वसिष्ठ ब्रम्हा, विश्वामित्र होता व आयास्य उद्गाता अशी योजना करून यज्ञाला आरंभ केला. या यज्ञामुळे इंद्राला फार आनंद झाला. त्याने भेट म्हणून हरिश्चंद्राला सोन्याचा रथ दिला. शुन:शेपाचे माहात्म्य पुढे समजेल. यज्ञ वगैरे सुरळीत पार पडल्यावर व रोहित स्थिरस्थावर झाल्यावर हरिश्चंद्राने राज्य त्याच्या स्वाधीन केले व आपण तपासाठी वनात निघून गेला. रोहित पासून सातव्या पिढीत बाहुक जन्माला आला. त्याचे राज्य शत्रूंनी हिरावून घेतले. म्हणून तो वनात और्वऋषींच्या सहवासात राहू लागला. तिथेच त्याला मृत्यू आला. त्यावेळी त्याची पट्टराणी सहगमनास सिद्ध झाली पण गरोदर असल्यामुळे  और्वऋषींनी तिला सहगमन करू दिले नाही. तिच्या सवतींना मत्सर वाटून त्यांनी तिला मारण्यासाठी तिच्या अन्नात विष कालवून तिला खायला घातले. पण और्वमुनींच्या रक्षणामुळे ती वाचली.

तिचा पुत्र सगर. तो फार पराक्रमी निघाला. त्याने आपल्या बापाचे राज्य परत मिळवले. नंतर दिग्विजय करून सार्वभौम राजा झाला.  कालांतराने सगराने और्वमुनींच्या मार्गदर्शना खाली दुसरा अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरवले. दिग्विजयासाठी अश्व सोडला. अश्व रक्षणा साठी सुमती नामक राणी पासून झालेले सगळे पुत्र पाठवले. ते सगळे गर्विष्ठ व उध्दट होते. त्यामुळे इंद्राने यज्ञाचा अश्व गुप्त रीतीने कपिलमुनी जिथे ध्यानस्थ बसले होते तिथे नेऊन ठेवला. अश्वाचा शोध घेताना सगरपुत्रांना तो कपिलमुनींच्या जवळ दिसला. अश्व परत मिळवण्यासाठी सगरपुत्र इंद्राने भुरळ घातल्यामुळे कपिलमुनींना ठार मारायला धांवले. कोलाहलाने समाधी भंग पावलेल्या कपिलमुनींनी डोळे उघडून समोर पाहताच ते साठहजार सगर पुत्र त्यांच्या स्वत:च्या पापाग्नित भस्म झाले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- नववा स्कंध

पुष्प ११७ वे (अध्याय ८ पूर्ण व ९ चालू)

## राजा भगीरथ

सगर आपल्या पुत्रांची वाट पहात होता. पण ते येत नाहीत असे पाहून सगराने केशिनी नामक दुसऱ्या पत्नी पासून झालेल्या असमंजस नामक पुत्राच्या अंशुमान नामक ज्येष्ठ पुत्राला काकांचा शोध घेण्यास पाठवले.

अंशुमान आजोबांचा आज्ञाधारक, शालीन, ज्ञानसंपन्न, व पराक्रमी नातू होता. अंशुमानचा पिता असमंजस पूर्वजन्मातला महान् योगी होता. तो वेड्यासारखा वागत असे म्हणून लोक त्याला असमंजस म्हणत असत. एकदा त्याने शरयू नदीच्या तीरावर खेळत असलेल्या गांवातल्या मुलांना नदीत फेकून दिले. सगराकडे तक्रार गेली. सगराने पुत्रप्रेम बाजूस सारून प्रजा हितासाठी असमंजसाला तडीपार करण्याची आज्ञा दिली. तेंव्हा नगरा बाहेर जाताजाता असमंजसाने उद्वेग झालेल्या सर्व नागरिकांची मुले नदीतून सुखरूप बाहेर काढून दिली व मगच पलायन केले. त्यामुळे अयोध्यावासी लोकांना व सगर राजाला आपण एका थोर पुरुषाला ओळखू शकलो नाही याचे मनस्वी दु:ख झाले. अशा असमंजसाचा अंशुमान हा पुत्र होता.

अंशुमान आपल्या चुलत्यांचा शोध घेत घेत कपिलमुनींच्या समीप आला. तिथेच त्याला अश्वही दिसला. ध्यानस्थ असलेल्या कपिलांना त्याने हात जोडून व मस्तक टेकून नमस्कार केला. व म्हणाला " मायेचा स्पर्श नसलेल्या हे प्रभो! घर-दारादी प्रपंचाला सत्य मानून संसारचक्रात फिरणारा हा बालक आपल्या कृपेची याचना करीत आहे!" अंशुमानाने कळवळून व मनापासून केलेल्या प्रार्थनेमुळे कपिलमुनी देहभानावर आले व म्हणाले, " हे बाळा अंशुमाना! हा तुझ्या आजोबांचा यज्ञीय पशू आहे तो तूं घेऊन जा! समोर जो राखेचा ढीग दिसत आहे तो तुझ्या चुलत्यांच्या दग्ध झालेल्या शरीराचा आहे. त्यांच्या उध्दारासाठी गंगा आवश्यक आहे.

कपिल मुनींचे हे भाषण ऐकून अंशुमानाने त्यांना मन:पूर्वक साष्टांग नमस्कार केला व अश्व घेऊन अयोध्येस परत आला. सगराचा अश्वमेध पूर्ण झाला. अश्वमेध पूर्ण होताच सगराने अंशुमानाला राजा केले व स्वत: तपाचरणास वनात और्वमुनींच्या कडे गेला व आत्मज्ञान प्राप्त करून मुक्त झाला.

अंशुमानाचा पुत्र दिलीप. दिलीप वयात आल्यावर त्याच्यावर राज्य सोपवून अंशुमान गंगा भूमीवर आणण्यासाठी तप करण्यास वनात गेला. तप करता करताच तो पंचत्व पावला. त्यामुळे गंगा भूमीवर आणण्याचे अंशुमानाचे कार्य पूर्ण करण्यासाठी दिलीप राजा आपला पुत्र भगीरथावर राज्य सोपवून तपासाठी निघून गेला. कर्मधर्म संयोगाने तो ही तप करता करता पंचत्व पावला. म्हणून त्याचा पुत्र भगीरथाने गंगा भूमीवर आणण्यासाठी अथक प्रयत्न केले. गंगा त्याच्यावर प्रसन्न झाली पण ती म्हणाली " हे भगीरथा! मी भूमीवर येईन पण माझ्या प्रचंड वेगाने भूमी दुभंगून मी रसातळात जाईन. त्यामुळे माझा वेग सावरून धरणारा कोणीतरी समर्थ योगी हवा. त्याशिवाय माझ्यात स्नान करणाऱ्या प्रत्येकच जीवाचे पाप मला धूत बसावे लागणार. त्यामुळे मी पृथ्वीवर येण्यास उत्सुक नाही.

भगीरथ म्हणाला " हे कलुषभंगे देवी! भूतलावर अनेक ब्रम्हनिष्ठ सत्पुरुष आहेत. श्रीहरी नित्य त्यांच्या हृदयात वास करत असतो. ते तुझ्यात स्नान करून तुला पुन्हा पुनीत करतील त्यामुळे प्रश्न फक्त वेग अडवण्याचा आहे. ते काम योगेश्वर भगवान शिवशंकर करतील. गंगेने ते मान्य केले. राजा भगीरथाने भगवान शिवाच्या उपासनेने त्यांना प्रसन्न केले. भगवान शिवांनी गंगा आपल्या मस्तकावर धारण केली व जटेत गुंडाळून गंगेचा संथ प्रवाह भगीरथासाठी सोडला. गंगा भगीरथाच्या रथा मागून निघाली. भगीरथ सगरपुत्रांच्या भस्मस्थानी आला. गंगाजल त्या भस्माला लागताच ते सगळे सगरपुत्र मुक्त होऊन स्वर्गात गेले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- नववा स्कंध

पुष्प ११८ वे (अध्याय ९ पूर्ण व १० चालू)

## राजा सौदास व राजा रामचंद्र

भगीरथा पासून सातव्या पिढीत मित्रसह राजा जन्मास आला. त्याला कल्मषपाद व सौदास असेही संबोधले जाई. त्याने एकदा शिकार करताना एका राक्षसास ठार मारले. तेंव्हा त्या राक्षसाच्या भावाने सौदासवर सूड उगवायचा म्हणून मानवी रूप धारण करून राजाचे सेवकत्व स्वीकारले. राजाने त्याला रसोईघराच्या व्यवस्थेवर ठेवले. त्यावेळी ह्या दुष्ट राक्षसाने श्राद्धान्न म्हणून नरमांस शिजवले आणि वसिष्ठ भोजनास बसल्यावर प्रथम त्यांनाच वाढले.

वसिष्ठ तत्काळ पानावरून संतापून उठले व सौदासाला शाप दिला कीं "तूं मला नरमांस वाढल्यामुळे तूं राक्षस योनीत जाशील! आपला काहीच दोष नसताना आपल्याला वसिष्ठांनी शाप दिला म्हणून राजा सौदासने पण वसिष्ठांना शाप देण्यासाठी ओंजळीत पाणी घेतले. पण पत्नी मदयंतीने राजाला त्या विचारापासून परावृत्त केले.

तेवढ्यात वसिष्ठांनी अंतर्ज्ञानाने सर्व जाणून आपल्या शापाचा कालावधी फक्त बारा वर्षांचा केला. सौदासाने शापासाठी हातात घेतलेले पाणी आपल्याच पायावर टाकले म्हणून तो कल्मषपाद म्हणून ओळखला जाऊ लागला. राजा सौदास राक्षस होऊन वनात निघून गेला. क्षुधार्त राक्षस झालेला सौदास एका ब्राम्हणाला खायला गेला. त्याच्या ब्राम्हणीने खूप विनवले पण सौदासाने त्या ब्राम्हणास खाल्लेच. त्यामुळे संतापलेल्या ब्राम्हणीने आपल्या पतीच्या अस्थि गोळा करून सती जाताना सौदासला शाप दिला कीं कालांतराने तूं परत राजा होऊन जेंव्हा आपल्या पत्नी बरोबर रतीसुखा साठी तिच्या जवळ जाशील तेंव्हा तूं ही मृत्यू पावशील. पुढे बारा वर्षांनी जेंव्हा सौदास राजा होऊन परत आला तेंव्हा शापग्रस्त असल्याने त्याने वासिष्ठाना विनंती करून मदयंतीच्या उदरी संतती उत्पन्न करून घेतली. पण सात वर्षे झाली तरी ती संतती मदयंतीच्या उदरातून बाहेर येईना! म्हणून वसिष्ठांनी तीक्ष्ण अश्म्याच्या सहाय्याने मदयंतीच्या पोटावर शस्त्रक्रिया करून त्या संततीला बाहेर काढले.

मग अश्म्याच्या मदतीने जन्मलेल्या त्या पुत्राचे नाव अश्मक असे ठेवले. अश्मकाचा पुत्र "मूलक"! त्याला मूलक हे नाव पडण्याचे कारण असे कीं मूलक लहान बालक असताना परशुराम मेदिनी नि:क्षत्रिय

करीत होते. अश्मकाच्या वधानंतर अश्मकपुत्राला वाचवण्यासाठी सगळया स्त्रियांनी अश्मकपुत्राभोवती गराडा घातला. त्यामुळे त्याचे रक्षण झाले व आता पुढील क्षत्रियांचा तो मूळपुरुष होणार म्हणून त्या स्त्रियांनी त्याचे नाव मूलक असे ठेवले. तसेंच नारींनी कवच करून रक्षण केले म्हणून त्याला नरीकवच असे दुसरे नावही प्राप्त झाले.

मुलकाचा पणतू विश्वसह. विश्वसह राजाला खट्वांग नामक पराक्रमी पुत्र झाला. खट्वांग आपल्या दिग्विजयाने चक्रवर्ती राजा झाला. त्याच्या पराक्रमावर भाळून देवांनीही त्याला आपल्या मदतीस बोलावून घेतले व दैत्यांवर विजय संपादन केला. त्यामुळे खट्वांगावर खुश होऊन देवांनी त्याला हवा तो वर मागून घे असे म्हटले. त्यावेळी आपले आयुष्य किती उरले आहे? असे राजा खट्वांगाने विचारले. देवांनी तुझे आयुष्य आता फक्त दोन घटका उरले आहे असे सांगितले. हे ऐकताच राजा खट्वांगाने मुक्ती प्राप्त व्हावी असा वर मागितला. देवानी "तथास्तु" असे म्हणताच राजा खट्वांग तत्काळ अयोध्येस आला. राज्य आपल्या पुत्राच्या स्वाधीन केले. आणि स्वत: नि:संग होऊन हृदयस्थ परमेश्वराच्या चिंतनात एकाग्रतेने मुक्ती प्राप्त करून घेतली. खट्वांगा नंतर त्याचा नातू रघु हा एक महान् चक्रवर्ती राजा झाला व याच रघुकुळात रघूचा नातू दशरथ जन्मास आला. ह्याच दशरथाच्या घरी ब्रम्हस्वरूपी श्रीहरीने ब्रम्हदेवासह इतर देवांनी प्रार्थना केल्यावरून राम, लक्ष्मण, भारत व शत्रुघ्न यांच्या स्वरुपात अवतार धारण केला. हे राजन्! वाल्मिकींनी वर्णन केलेले रामावताराचे सविस्तर चरित्र पूर्वी तूं अनेक वेळा श्रावण केले आहेस. ते आता थोडक्यात स्मरण करू. पितृवचन सत्य करण्यासाठी राज्यत्याग करणे. चवदा वर्षे वनवास पत्करणे. शुर्पणखेला विद्रूप केल्यामुळे सीता हरण होणे. मग सीतेच्या शोधत वणवण हिंडणे. वानरांची मदत घेऊन सीता शोध करणे. समुद्रावर सेतूं बांधणे. रावणाचा संहार करून सीता परत मिळवणे. इत्यादी अद्भुत कर्म करणारा कोशलाधिपती श्रीराम आमचे रक्षण करो.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प ११९ वे (अध्याय १० पूर्ण)

## श्रीरामचरित्र

शुकमुनी पुढे सांगू लागले " राजन्! थोडक्यात आपण रामचरित्रातील वैशिष्ट्ये समजून घेऊ. विश्वामित्रांनी रामांना बालवयात यज्ञ रक्षणासाठी नेले. त्या बालवयात त्यांनी मरीचादी राक्षसांचा पराभव केला व विश्वामित्रांचा यज्ञ निर्विघ्न पार पडू दिला. नंतर सीता स्वयंवर मंडपात तीनशे सेवकांनी वाहून आणलेले प्रचंड मोठे व जड शिवधनुष्य होते. त्याला प्रत्यंचा लावण्याचा "पण" होता. मोठ मोठ्या योध्या महाराजांनाही ते जमले नाही तेंव्हा विश्वामित्रांच्या आज्ञेने प्रभूरामचंद्रांनी त्या धनुष्याला सहज उचलून त्याला प्रत्यंचा लावताना ते मोडून टाकले. व साक्षात् लक्ष्मीचा अवतार असलेल्या सीतेचा त्यांनी स्वीकार केला. एकवीस वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय करणाऱ्या परशुरामांचा गर्व प्रभुरामचंद्रांनी हरण केला. सत्यवचनी सदाचरणी पिता दशरथाची आज्ञा शिरसावंद्य मानून एका रात्रीत राजवैभवाचा त्याग करून सीतेसह आनंदाने वनवासात निघून गेले. वनात रावणाची बहिण शूर्पणखा जेंव्हा दुष्ट बुद्धीने त्याच्याकडे आली तेंव्हा तिला विद्रूप करून पाठवले. त्यावेळी खर दूषणादी राक्षस चार हजार सेनेसह त्यांच्यावर तुटून पडले. तेंव्हा त्या सर्वांचा प्रभूरामचंद्रांनी वध केला. त्यामुळे संतापून शुर्पणखेने सर्व वृत्त रावणास सांगून त्याच्या मनात सीतेची अभिलाषा उत्पन्न करून दिली. रावणाने मारीचाला सुवर्ण मृगाचे रूप घ्यायला लावून व सीतेला भुलवून पळवून आणले. त्यावेळी हरीण रुपी मारिचाचा वध करून राम जेंव्हा परत आले तेंव्हा उजाड आश्रम पाहून त्यांना विलक्षण शोक झाला. लक्ष्मणासह ते सीता शोधार्थ रानोमाळ भटकू लागले. वाटेत त्याना मरणोन्मुख जटायू भेटला व त्याने रावणविरोधामुळे झालेला आपला पराभव कथन करून प्राण सोडला. रामांनी त्याचे और्ध्वदेहिक करून पुढचा मार्ग अक्रमला. वाटेत कबंध नामक राक्षसाचा वध करून ते ऋष्यमूक पर्वता जवळ आले. तिथे हनुमंताची भेट झाली व सुग्रीवाशी सख्य झाले. रामांनी वालीचा वध करून सुग्रीवाचे वानर सैन्य आपल्या मदतीस घेतले. मग हनुमंताने सीतेचा शोध लावला. लंकेला जाऊन रावणाशी युध्द करणे गरजेचे झाले म्हणून समुद्रावर सेतू बांधून सर्व वानरसेनेसह रामांनी लंका गमन केले. लंकेला गेल्यावर रावणाचा भाऊ बिभीषण प्रभुरामचंद्रांना शरण आला. त्यावेळी प्रक्षुब्ध झालेल्या रावणाने निकुंभ, कुंभ, धूम्राक्ष, दुर्मुख, सुरांतक, नरांतक, कुंभकर्ण, आपला पुत्र इंद्रजित, प्रहस्त, अतिकाय, विकम्पन इत्यादी सर्वांना युद्धास पाठवले. त्यांचा प्रतिकार लक्ष्मण, हनुमंत, अंगद इत्यादी

सेनापतींसह प्रभुरामांनी केला. घनघोर युध्द झाले. रावणसेना प्रचंड संख्येने धारातीर्थी पडूलागल्याने रावण संतापला. आणि विमानातून प्रभुरामचंद्रांशी युद्धाला आला. ते पाहून इंद्राने मातलीसह आपला दिव्य रथ प्रभुरामचन्द्रांना दिला. त्यावेळी समोर आलेल्या रावणाला प्रभुरामचंद्र म्हणाले " अरे भ्याडा! धनी घरी नसताना कुत्र्याने घरातून पदार्थ पळवावा त्याप्रमाणे मी घरी नसताना माझी पत्नी तूं निर्लज्यपणे पळवून नेलीस. त्या निंद्य कृत्याचे फळ आज मी तुला देतो." असे वाक्ताडन करून प्रभुरामचन्द्रांनी अमोघ बाण सोडून रावणाचे हृदय शतश: विदीर्ण केले. रावण रक्त ओकत धारातीर्थी पडला. तेंव्हा मंदोदरीसह रावणाच्या सर्व स्त्रिया शोकाकुल होऊन म्हणू लागल्या " हे नाथ आजवर तूं लोकांना रडवलेस पण कामवासनेला बळी पडल्याने तुला सीतेच्या तेजाची कल्पनाच आली नाही. त्यामुळे तुला हा मृत्यू येऊन आम्ही मात्र विधवा झालो आहोत. तुझे शरीर गिधाडांचे भक्ष्य झाले आहे व तूं नरकाचा धनी झाला आहेस." असा शोक करीत त्या स्त्रिया रावणाला दोष देत होत्या. बिभीषणाने रावणाचे और्ध्वदेहिक केले. नंतर प्रभुरामचंद्र अशोकवनात सीतेकडे आले. दोघेही एकमेकांना पाहून भारावले गेले. दु:खी सीतेला पाहून प्रभूंचे अंत:करण द्रवले. त्यांचा तो भेटीचा हृद्य सोहळा झाल्यावर प्रभुरामचंद्रांनी बिभीषणाला लंकेचा अधिपती म्हणून राज्याभिषेक करविला. बिभिषणाच्या सेवेवर खुश होऊन प्रभूंनी त्याला कल्पांतापर्यंतचे आयुष्य प्रदान केले. मग सीतेसह प्रभूरामचंद्र विमानात बसले. त्यांच्या बरोबर लक्ष्मण, हनुमंत, अंगद, सुग्रीव इत्यादी सर्व निघाले. भरत नंदिग्रामी तापसवेश धारण करून व गोमूत्रात शिजवलेले यवान्न भक्षण करून विरक्ततेने जीवन जगत असल्याचे समजल्यामुळे प्रभुरामचंद्र प्रथम नंदिग्रामी गेले. सर्वांसह प्रभुरामचंद्र प्रथम आपल्या भेटीस आल्यामुळे भरताचा कंठ दाटून आला. त्याने श्रीरामांच्या पादुका मस्तकावर धारण केल्या व मगच नंदीग्राम सोडले. प्रचंड उत्साहाने व मंगल वाद्यांच्या मधुर ध्वनिसह वेद घोषात भगवान श्रीरामांचा अयोध्या प्रवेशाचा सोहळा पार पडला. राजप्रासादात प्रवेश करताच प्रभुरामचंद्र प्रथम कैकयीच्या पाया पडले. मग सुमित्रेला वंदन केले व मग कौसल्यामाते जवळ आले. कौसल्यामातेचा उर आधीच भरून आलेला होता. प्रभूरामांनी कौसल्या मातेला वंदन करताच तिने त्यांच्यावर प्रेमाश्रूंचा अभिषेक केला. प्रभुरामचंद्रांनी नंतर सर्व वडील मंडळींचा सन्मान केला. सर्वांचा भावावेग कमी झाल्यावर वसिष्ठ महामुनींच्या देखरेखी खाली इक्ष्वाकू वंशातल्या वृद्धांनी प्रभुराम व लक्ष्मण यांच्या जटा सोडवल्या. चार सागरोदकांनी त्यांना अभिषेकादी विधी केले. रत्नजडीत किरीट-कुंडले व चमचमणारी राजवस्त्रे धारण केलेले राम-सीता, लक्ष्मण-उर्मिला व भरत, शत्रुघ्न त्यांच्या भार्यांसह राजप्रासादाची शोभा वृद्धिंगत करू लागले. योग्य समयी भरताने विनम्र व भावपूर्ण शब्दात विनंती केल्या वरून प्रभुरामचंद्रांनी कोसलाधिपती म्हणून अयोध्येच्या राजसिंहासनाचा स्वीकार केला. अयोध्येत रामराज्य सुरु झाले. इथे थोडे थांबून शुकमुनी म्हणाले, " राजन्! त्यांच्या राज्याला " रामराज्य " म्हणण्याचे कारण त्यांच्या राज्यात भूमी, नद्या, पर्वत, समुद्र इत्यादी सर्वांपासून प्रजेला उपयुक्त वस्तू मुबलक प्रमाणात मिळू लागल्या. प्रजेचे आरोग्य निरोगी होते. प्रजेत भय, चिंता, द्वेष, मत्सर, दारिद्र्य, शक्तीक्षीणता, अकाली मृत्यू इत्यादी संभवत नव्हते. ह्या सर्वांचे कारण प्रभुरामचंद्रांनी मानव अवतारात येऊन इंद्रियनिग्रह, निस्पृहता, निरपेक्षता, धर्माचरण यांचा जो आदर्श निर्माण केला त्या आदर्शांमुळे त्यांचे राज्य हे त्यांच्याच नावाने म्हणजे " रामराज्य " म्हणून ओळखले जाऊ लागले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२० वे (अध्याय ११, १२ व १३)

## इक्ष्वाकुवंश व निमी वंश

प्रभुरामचंद्र या प्रमाणे राज्य करू लागले. प्रजाकल्याणाची अनेक कामे केली. भरपूर यज्ञ व दानधर्म केला. इतका कीं सगळी पृथ्वी त्यांनी यज्ञकर्त्या होता, अध्वर्यू, उद्गाता व ब्रम्हा यांना दान केली. पण रामराज्याचा प्रभाव असा कीं ते ऋत्विज म्हणाले, " हे रामचंद्रा! आपल्या तेजाने तूं आमच्या हृदयात प्रवेश करून आमचा अविद्येचा अंध:कार दूर करतोस. त्या ज्ञानामुळे होणाऱ्या तृप्तीने आम्ही परिपूर्ण असल्यामुळे तुझे पृथ्वीचे दान आम्हाला नको. ते तुझे तूंच सांभाळ!" असे म्हणून त्यांनी विधिपूर्वक श्रीरामांना पृथ्वीचे दान परत केले. अशाप्रकारे राज्यकारभार चालू होता. पण प्रजाजनाचे सर्व थरातले मनोगत जाणून घ्यावे या उद्देशाने श्रीराम कोणाला कल्पनाच येणार नाही अशा गुप्त वेषाने नगरात फिरू लागले. तेंव्हा एका घरातून त्यांना एका मनुष्याचा संवाद ऐकूआला, " जा! तुला आता मी माझ्या घरात घेणार नाही. कारण तूं परगृही वास केलाआहेस. आणि एक गोष्ट लक्षात ठेव कीं रामांनी जरी परगृही वास केलेल्या सीतेचा स्वीकार केला असला तरी मी काही तसा स्त्रीलंपट नाही. त्यामुळे तूं चालती हो!" हे ऐकून प्रभुरामचंद्र विचार करू लागले. अज्ञानी लोकांचे समाधान करता येणे कठीण असते. म्हणून वासिष्ठादी मुनीच्या विचाराने लोकापवाद नको म्हणून श्रीरामांनी राजाच्या कर्तव्यांच्या भावनेतून सीता गरोदर असतानाही मनावर दगड ठेवून त्याग करण्यास अत्यंत अवघड अशा पवित्र सीतेचा त्याग केला. सीता वाल्मिकींच्या आश्रमात राहू लागली. वाल्मिकींनी तिचा सांभाळ केला. योग्य समयी तिला पुत्र युग्म झाले. ते लव व कुश या नावांनी प्रसिध्द झाले. पुढे श्रीरामांच्या एका अश्वमेध यज्ञाच्या समयी सीतेने आपले दोन्ही पुत्र वाल्मिकींच्या पदरात घातले. आणि स्वत: श्रीरामांच्या चरणांचे ध्यान करीत भूमातेच्या उदरात प्रवेश करून आपले भूतलावरचे वास्तव्य संपवले. हे समजल्यावर राजवाड्यात राहूनही प्रभुरामचंद्रांनी तपस्वी जीवन स्वीकारले. प्रचंड वैभव अवती भोवती असूनही निग्रही व सुस्वभावी श्रीराम त्यात जराही आसक्त झाले नाहीत. त्यांनी मर्यादा पुरुषोत्तम म्हणून भूतलावर मानवी जीवनाचा आदर्श निर्माण केला. अशा या दिव्य रघुकुल नायकाला मी शरण आहे. वाल्मिकींनी लिहिलेल्या या रामचरित्राचे स्मरण सर्वांना कर्मबंधनातून मुक्त करणारे आहे. प्रभूरामचंद्रांच्या नंतर कुश राजा झाला. कुशापासून तेराव्या पिढीत

हिरण्यनाभ नामक राजा उदयाला आला. हा जैमिनीमुनींना शरण गेला व त्याने योगविद्या आत्मसात केली. ह्याच हिराण्यानाभा पासून याज्ञवल्क्य ऋषी झाले. त्यांनी आत्मज्ञान प्राप्त करून घेतले. हिराण्यानाभापासून पांचव्या पिढीत मरूत् नामक महा तपस्वी राजा निर्माण झाला. त्याने आत्मसिद्धी व आत्मज्ञान प्राप्त करून घेतले. मग पुत्र प्रसुश्रुत याच्या हवाली राज्य केले. व मरूत् स्वत: कलापग्रामी गेला. तिथे कलियुगाच्या अंतापर्यंत राहून मग प्रलया नंतर सूर्यवंशाचे पुनरुज्जीवन मरूत् करील. मरूत् नंतर बाराव्या पिढीत बृहद्बल राजा झाला. इथे थोडे थांबून शुकमुनी म्हणाले, " राजन्! कौरव पांडव युद्धात बृहद्बल कौरवांच्या बाजूने लढत असताना तुझा पिता अभिमन्यु याने त्याच्याशी युध्द करून त्याला धारातीर्थी पाडला. बृहद्बला नंतर इक्ष्वाकू वंश अठ्ठावीस पिढ्या चालेल व कलियुगात शेवटचा राजा सुमित्र होऊन ह्या इक्ष्वाकू वंशाचा शेवट होईल. शुकमुनी पुढे सांगू लागले , " राजन्! आता इक्ष्वाकुचा दुसरा पुत्र निमीराजाचा वंश ऐक. निमीने यज्ञ करावयाचे ठरवून वसिष्ठांना पाचारण केले. पण वसिष्ठ इंद्राचा यज्ञ पुरा करून येतो असे सांगून जे गेले ते खूप वर्षे झाली तरी आले नाहीत. मग बरीच वर्षे वाट पाहून व आपल्या क्षणभंगुर जीवनाचा विचार मनात आणून निमीने दुसऱ्या ऋत्विजांच्या सहाय्याने यज्ञ सुरु केला. आणि यज्ञ चालू झाल्यावर वसिष्ठ तिथे आले. निमीने आपल्याला डावलून यज्ञ केल्याचा राग येऊन वसिष्ठांनी निमीला देहपाताचा शाप दिला. तो शाप ऐकून निमीने त्यांना प्रतिशाप दिला, " धर्माचा विचार न करता स्वत:च्या लोभासाठी मला शाप देणाऱ्या तुमचाही देहपात होवो!" वसिष्ठांनी तो शाप स्वीकारून लगेच देह सोडला. व मित्रावरूणापासून उर्वशीच्या पोटी जन्म घेतला. निमीचा देह पडताच यज्ञकर्त्या ऋषींनी निमीच्या देहाचे सुगंधी द्रव्यात जतन केले. व यज्ञ पूर्ण केला. त्यावेळी प्रकट झालेल्या यज्ञदेवतेकडून त्यांनी निमीला सजीवत्व मागितले. त्याचवेळी निमीने स्वत:ला भगवान श्रीविष्णुंच्या चरणी आश्रय मागितला. यज्ञ देव निमीला "तथास्तु" म्हणाले पण ऋत्विजांना म्हणाले, शरीर धारण न करता निमीचे अस्तित्व विदेहरूपाने प्राण्यांच्या नेत्रात आज पासून उघड-झाप होऊन निमिषाच्या स्वरूपाने राहील. त्यायोगे निमी पापण्यांच्या मध्यात राहून नेत्रांची उघड-झाप होऊ लागली. पण देशाला राजा हवा म्हणून ऋत्विजांनी निमीच्या देहाचे मंथन करून एक पुत्र निर्माण केला. त्या विलक्षण प्रकाराने उत्पन्न केलेल्या बालकाचे नाव जनक असे ठेवले. तसेच तो विदेही निमीचा पुत्र म्हणून त्याला वैदेह म्हणू लागले. मंथनापासून झाला म्हणून मिथिल असे तिसरे नावही त्याला मिळाले. मिथिलराजाने जी नगरी वसवली तिला लोक मिथिलानगरी म्हणून संबोधू लागले. ही मिथिलानगरी जनकराजाची अथवा मिथिलराजाची राजधानी झाली. त्या मिथिला नगरीत राज्य करणाऱ्या सर्वच राजांना जनक राजा असे संबोधले जाऊ लागले. पहिल्या जनकराजा पासून एकविसावा राजा सीरध्वज. या सीरध्वजराजाला यज्ञासाठी भूमी नांगरत असताना जी कन्या सांपडली ती जनक नंदिनी जानकी! सीर म्हणजे नांगर हा त्याच्या कीर्तीचा ध्वज झाला म्हणून त्याला सीरध्वज असे नाव पडले. याज्ञवल्क्य हे या कुळाचे कुलगुरू. योगेश्वर याज्ञवल्क्यांच्या कृपेमुळे मिथिलेचे सगळे राजे अध्यात्मविद्येत निष्णात होत असत. त्यामुळे गृहस्थाश्रामातही ते सुख-दु:खादी द्वंद्वा पासून अलिप्त असत.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

## ।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२१ वे (अध्याय१४)

## सोमवंश

हे राजा परीक्षित! आतां भगवान श्रीकृष्णांनी जन्म घेतलेल्या पवित्र सोमवंशाचा वृत्तांत ऐक!

ब्रम्हदेवांचा परम तेजस्वी पुत्र अत्री. अत्रिमुनींचा पुत्र सोम. ब्रम्हदेवांनी त्याला औषधी व नक्षत्रांचे अधिपती बनवले. सोमाने स्वपराक्रमाने तिन्ही लोक जिंकून राजसूय यज्ञ केला. नंतर गर्वाने उन्मत्त झाला. बृहस्पतीच्या तारा नामक पत्नीला पळवून घेऊन गेला. बृहस्पतीने बरेच दिवस व वारंवार विनंती करूनही सोमाने त्यांना दाद दिली नाही. बृहस्पती हे देवांचे गुरु असल्यामुळे इंद्र बृहस्पतींची बाजू घेऊन सोमाशी युद्धाला निघाला. त्या संधीचा फायदा घेऊन दैत्य सोमाच्या बाजूने युद्धाला आले. भयानक युध्द होऊ लागले. आता हे निरर्थक युध्द नको म्हणून काही काळाने बृहस्पतीचे पिताश्री अंगिरस यांनी ब्रम्हदेवांना जाऊन विनंती केली. त्यावेळी ब्रम्हदेवांनी युद्ध थांबवून व सोमाकडे जाऊन सोमाची कान उघाडणी केली व ताराला घेऊन बृहस्पतींच्याकडे आले. त्यावेळी बृहस्पतीला आनंद झाला पण तारा गरोदर असल्याचे पाहून संतापला! ताराला म्हणाला " तूं माझी पत्नी असल्यामुळे इतरांनी स्थापन केलेल्या गर्भाचा त्याग कर! कारण मला तुझ्या ठिकाणी संतती उत्पन्न करण्याची इच्छा आहे." आपल्या पतीचे हे बोलणे ऐकून तारेला लज्जा उत्पन्न झाली व तिने एका तेजस्वी बालकाला जन्म दिला. ते तेजस्वी व सुंदर बालक पाहून बृहस्पती व सोम दोघांनाही त्या बालकाचा मोह उत्पन्न झाला व त्या पुत्रावरून पुन्हा त्या दोघात भांडण सुरु झाले. तेंव्हा तिथे उपस्थित असलेल्या देवांनी निर्णया करिता "हा कुणाचा पुत्र आहे?" असा प्रश्न तारालाच विचारला. पण लज्जित झालेली तारा काहीच बोलेना.

तेंव्हा ब्रम्हदेवांनी तिला एकांतात नेऊन अभय देऊन विचारले. तेंव्हा तिने तो सोमाचा पुत्र असल्याचे सांगितले. त्यामुळे सोमाने त्याचा स्वीकार केला. त्याचे नाव बुध! ह्याच बुधापासून पूर्वी वर्णन केलेल्या इलेच्या ठिकाणी पुरुरव्याची उत्पत्ती झाली. त्या पुरुरव्याच्या पुरुषार्थाचे, पराक्रमाचे, त्याच्या सौंदर्याचे वर्णन नारदांनी इंद्रसभेत इंद्राला सांगितले. ते उर्वशीने ऐकले. त्याचवेळी ती मित्र व वरुण यांनी दिलेल्या शापामुळे मनुष्य लोकी जाण्यास निघाली होती. ती सरळ राजा पुरुरवा जिथे वनविहार करीत होता तिथे आली. तिला पाहाताच पुरुरवा आनंदला. उभयतांची दृष्टादृष्ट झाली. आणि राजाने उर्वशीकडे आपले मनोगत नि:शंकपणे व्यक्त करून तिला मागणी घातली. उर्वशी नुसत्या वर्णनाने भाळली होती ती आता प्रत्यक्ष भेटीने तर अधिकच प्रभावित झाली व राजाच्या मागणीमुळे सुखावली. पण तिने दोन अटींवर राजाची मागणी पुरी करायचे ठरवले व म्हणाली " हे नरोत्तम! तुला पाहून तुझ्यावर आसक्त न होणारी स्त्री या जगात तरी असेल असे मला वाटत नाही. तथापि दोन अटींवर मी तुझी मागणी पुरी करीन. एक अट

अशी कीं माझ्या जवळ असलेल्या दोन कोकरांचे रक्षण करायचे  व दुसरी अट म्हणजे रतीप्रसंगाखेरीज इतर कोठेही तूं मला नग्नावस्थेत दिसता कामा नये. या दोन अटींपैकी कोणत्याही एका अटीचा भंग झाल्यास मी तुझ्या जवळ राहाणार नाही."

राजाने दोन्ही अटी मान्य केल्या. नंतर  राजा पुरुरवा उर्वशी बरोबर देवांच्या चैत्ररथ वनात जाऊन उर्वशीच्या अंगाला येणाऱ्या कमलपुष्पांच्या सुगंधात धुंद होऊन मनसोक्त विहार करु लागला. उर्वशी पुरुराव्याशी रममाण झाली. बराच काल लोटला. स्वर्गात इंद्राला उर्वशी खेरीज करमेनासे झाले. त्याने चित्ररथ गंधर्वाला उर्वशीला परत आणण्याची आज्ञा दिली. चित्ररथ गंधर्वाने युक्ती केली. तो एका रात्री पुरुरवा व उर्वशी एकांत करीत असताना चित्ररथ वनात आला. मध्यरात्रीच्या काळोखात गंधर्वांनी उर्वशीच्या दोन्ही कोकरांना ओढून न्यायला सुरुवात केली. कोकरे केविलवाणी ओरडू लागली. उर्वशीचा विरह होऊ नये म्हणून राजा पुरुरवा होता तसाच कोकारांचे रक्षण करण्यास धावला! गंधर्वांनी थोडे लांब पळून कोकरांना सोडून दिले.

राजा कोकरांना घेऊन परत निघाला. तेंव्हा गंधर्वांनी आपल्या मायेने राजावर प्रकाश पडला. उर्वशीला राजा नग्नावस्थेत कोकरांना घेऊन येताना दिसला. राजाने आपली अट मोडली म्हणून उर्वशी उठून जाऊ लागली. पुरुरवा विरह कातर स्वरात तिची मनधरणी करू लागला. उर्वशी त्याला म्हणाली राजा आमच्या सारख्या व्यभिचारिणी अप्सरांचा कधी भरोसा धरू नये. कारण आमचे सख्य कधीही स्थिर नसते. अल्प लाभासाठी सुध्दा आम्ही कुणाचाही घात करण्यास मागे पुढे पहात नाही. तथापि मी एक वर्षाने एका रात्री तुझ्या पुत्राला घेऊन तुझ्याकडे येईन. त्यावेळी तुझी इच्छा पुरी करून जाईन. मी वर्षाच्या शेवटच्या रात्री येऊन तुझी इच्छा पुरी करून जात जाईन. त्यातच तूं समाधान मान.

उर्वशी गरोदर असल्याचा आशय समजून राजा शांतपणे आपल्या नगरीस परत आला. वर्ष अखेर उर्वशी पुरुरव्याच्या पुत्राला घेऊन चैत्ररथ वनात आली. ती रात्र राजाच्या सहवासात काढून उर्वशी परत गेली. अशा प्रकारे पुरुरव्यास सहा पुत्र झाले. पण पुरुरव्याला उर्वशीचा विरह सहन होईना म्हणून त्याने ध्यान-धारणेला सुरुवात केली. त्यात त्याला वेदांचे स्फुरण होऊ लागले म्हणून त्याने दोन अरण्या घेऊन त्यातली खालची अरणी म्हणजे उर्वशी व वरची अरणी म्हणजे आपण स्वत: व यज्ञासाठी उत्पन्न होणारा अग्नी आपला पुत्र असा संकल्प करून स्फुरण पावत असलेल्या वेद-मंत्रांनी घर्षण केले. त्यावेळी तीन वेदांच्या मंत्र प्रभावाने तीन अग्नी उत्पन्न झाले. पुरुराव्याने ते तीन अग्नी आपले पुत्र मानले. मग त्या अग्निंच्या योगाने त्याने यज्ञस्वामीच्या कृपेने गंधर्वलोकाची प्राप्ती करून घेतली. त्यावेळी कृतयुगाची अखेर आली होती. कृतयुगांत फक्त एकच अग्नी होता पण राजा पुरुराव्यामुळे तीन अग्नी प्राप्त झाले.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२२ वे (अध्याय१५)

## ऋचिक, जमदग्नी व परशुराम

पुरुरव्याला उर्वशी पासून जे सहा पुत्र झाले त्यातल्या पांचव्या विजय नामक पुत्रापासून पांचव्या पिढीत जन्हु नावाचा प्रसिध्द राजा झाला. जन्हु विष्णुभक्त होता. इतका कीं त्याच्या यज्ञाच्या वेळी गंगा त्याच्या यज्ञभूमीवरून जातेय असे लक्षात आल्यावर भगवान श्रीविष्णुंच्या कृपेने जन्हुने ती गंगा एका घोटात पिऊन टाकली होती.

जन्हु पासून सातव्या पिढीत गाधी नावाचा प्रसिध्द राजा झाला. गाधीराजाला सत्यवती नामक अत्यंत सुंदर कन्या होती. त्या कन्येला भृगु कुलोत्पन्न ऋचिकऋषींनी मागणी घातली. पण ऋचिक आपल्या कन्येसाठी विजोड असल्याचे ठरवून गाधी राजाने त्यांना टाळण्यासाठी एकच कान शामवर्ण असलेले एक सहस्त्र शुभ्र अश्व मागितले. ऋचिकांनी वरुणाकडून तसे एक सहस्त्र अश्व आणून दिले. त्यामुळे ऋचिक-सत्यवती विवाह झाला. ऋचिकऋषींना सत्यवतीने पुत्र प्राप्ती व्हावी अशी इच्छा प्रगट केली. त्याचवेळी ऋचिकऋषींचे सामर्थ्य जाणून सत्यवतीच्या आईनेही तशीच प्रार्थना केली. तेंव्हा ऋचिक ऋषींनी दोन वेगवेगळया मंत्रांनी दोन चरू शिजवून सत्यवतीचा सत्यवतीला व तिच्या मातेचा तिच्या मातेला देऊन स्वत: स्नानासाठी नदीवर निघून गेले. सत्यवतीचा तेजस्वी चरू पाहून सत्यवतीच्या आईने चरुंची अदलाबदल केली. इतक्यात ऋचिकऋषी तिथे आले. त्यांनी हा अदलाबदलीचा प्रकार पाहून खेद व्यक्त केला. ऋचिक सत्यवतीला म्हणाले, " तुम्ही केलेल्या अदलाबदलीमुळे तुझ्या पोटी दंडधारी भयंकर पुत्र होईल. व तुझ्या मातेच्या पोटी ब्रम्हवेत्यांमध्ये श्रेष्ठ पुत्र होईल" हे ऐकून सत्यवतीने वाईट वाटून तसे घडू नये म्हणून पतीची प्रार्थना केली. तेंव्हा ऋचिक म्हणाले तुला पुत्र तसा नको असेल तर नातू तसा होईल. पण चरूचा प्रभाव टाळता येणार नाही. त्यमुळे सत्यवतीला जमदग्नी नामक पुत्र झाला. व सत्यवतीच्या मातेला विश्वामित्र नामक पुत्र झाला. जमदग्नींचा जन्म झाल्यावर योग्य समयी सत्यवती पतीकृपेने विरक्त होऊन कौशिकीं नदीत रुपांतरीत झाली. जमदग्नींनी पुढे रेणू राजाच्या रेणुका नामक राजकन्येशी विवाह केला.

जमदग्निंपासून जे चार पुत्र झाले त्यातला सर्वात धाकटा परशुराम. परशुराम हे साक्षात् भगवान श्रीविष्णुंचे अंशावतार आहेत. परशुरामांच्या वेळी हैहय कुलोत्पन्न अर्जुन नामक राजाने दत्तात्रेयांची

आराधना करून सहस्त्रबाहुंसह अकुंठीत इंद्रीयशक्ती व इतर अनेक सिद्धी प्राप्त करून घेतल्या होत्या. असा हा पराक्रमी राजा सहस्त्रार्जुन एकदा मृगया करताना जमदग्नींच्या आश्रमात सैन्यासह गेला. जमदग्नींनी त्याचे, त्याच्या अमात्यांचे व सर्व सेनेचे सहस्त्रार्जुनाच्या ऐश्वर्यावर मात करणारे स्वागत केले. जमदग्नींचे तप:सामर्थ्य अफाट होते. त्यांच्या जवळ कामधेनू होती. सहस्त्रार्जुनास वैषम्य वाटले व आश्रमातून निघताना त्याने आपल्या हैहय सैनिकांना कामधेनू बरोबर घेऊन चलण्याची आज्ञा दिली. सहस्त्रार्जुनाचे हैहय सैनिक कामधेनुच्या विरोधास न जुमानता तिला जबरदस्तीने वासरासह ओढीत घेऊन गेले. त्यावेळी परशुराम आश्रमात नव्हते. आश्रमात परत येताच त्यांना सर्व समजले. त्यांनी आपला परशू परजला. सहस्त्रार्जुनाच्या मागोमाग महिष्मतीला आले. सहस्त्रार्जुन त्यावेळी नुकताच नगर प्रवेश करीत होता. तो परशुरामांची गर्जना ऐकून तसाच मागे फिरला. त्याने आपले चतुरंग सैन्य परशुरामांवर सोडले. प्रचंड सैन्य आपल्यावर चालून येताना पाहून परशुरामांनी आपला परशू असा प्रेरला कीं तो विद्युतवेगाने सैनिकांचे हात छाटीत आक्रमण करीत चालला.परशुचे ते कार्य चालू असतानाच परशुरामांनी आपल्या अमोघ व असंख्य शर वृष्टीने त्या प्रचंड हैहय सेनचा नाश केला. उर्वरित सैन्य जीव मुठीत धरून पळू लागले. त्यांची आपसातच भयानक चेंगराचेंगरी होऊ लागली.

आपल्या सैन्याची ती केविलवाणी अवस्था पाहून संतापलेला सहस्त्रार्जुन उन्मत्तपणे परशुरामांवर धांवला. त्याने आपल्या सहस्त्र बाहूंनी पाचशे बाण एकाचवेळी परशुरामांवर सोडले. परशुरामांनी फक्त एकच बाण सोडून त्या पाचशे बाणांचा प्रतिकार केला. व परत आलेल्या परशुने सहस्त्रार्जुनाचे सहस्त्रच्या सहस्त्र हात तोडले व सहस्त्रार्जुन धरणीवर कोसळण्या पूर्वीच त्याचे मस्तक किरीट, कुंडलासह धडावेगळे केले. आपल्या बापाचा वध झालेला पाहून सहस्त्रार्जुनाचे पुत्र उंदरासारखे बिळात पळून गेले. त्यानंतर परशुराम कामधेनूला घेऊन आश्रमात आपल्या पित्याकडे परत आले. जमदग्नी सर्व वृत्तांत ऐकून म्हणाले, " बाळा! तूं मोठा पराक्रमी आहेस खरा! पण आपण ब्राम्हण आहोत, आपले सर्व सामर्थ्य क्षमेत साठवलेले असते. राजाच्या शरीरात सर्व देव वसत असतात. त्यामुळे मूर्धाभिषिक्त राजाचा वध हे आपल्यासाठी पाप आहे! तेंव्हा तूं भगवंताकडे चित्त लावून तीर्थ यात्रा कर म्हणजे पापमुक्त होशील.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- नववा स्कंध

पुष्प १२३ वे (अध्याय१६)

## परशुरामांचा क्षत्रिय संहार

परशुरामांनी पितृआज्ञा प्रमाण मानली. परशुराम भगवत्चिंतनात तीर्थ यात्रा करून निष्पाप झाले. वर्षभराने पित्याची सेवा करण्यास पित्याच्या आश्रमात परत आले. एके दिवशी नित्याप्रमाणे रेणुकामाता गंगेवरून घागर भरून आणीत असतां गंगेत तिला चित्ररथ गंधर्वाची अप्सरां बरोबर चाललेली जलक्रीडा दिसली. त्या दृश्यामुळे तिच्या मनात चलबिचल झाली. ती तशीच काही काळ त्यांचा प्रणय पहात उभी राहिली. इतक्यात अग्नीला आहुती देण्याची वेळ झाली ह्याचे भान येऊन ती परत निघाली. पण उशीर झालाच. घरी आल्या आल्या घागर ठेवून ती हात जोडून जमदग्नींच्या समोर उभी राहिली. जमदग्नींना तिच्या मनाची चलबिचल समजलीच. तिला पाहताच ते चांगलेच संतापले. त्यांनी आपल्या पुत्रांना रेणुकेला मारून टाकण्याची आज्ञा दिली. उपस्थित पुत्रांपैकी कोणीच धजावले नाही. इतक्यात इतरत्र गेलेले परशुराम आश्रमात परत आले. तेंव्हा जमदग्नींनी परशुरामांना आपले भाऊ व रेणुका यांना मारून टाकण्याची आज्ञा दिली. परशुरामांनी पितृआज्ञा प्रमाण मानून तसे केले. पित्याचे सामर्थ्य जाणून असलेल्या परशुरामांना मनस्वी वाईट वाटले. पण जमदग्नी संतुष्ट होऊन हवा तो वर माग असे परशुरामांना म्हणाले. तत्क्षणी परशुरामांनी " वधाचे स्मरण न राहाता मातेसह माझे सर्व बंधू पुनर्जीवित होवोत." असा वर मागितला. जमदग्नी "तथास्तु" म्हणताच झोप पूर्ण झाल्यावर सुखाने उठावे तसे सर्व जण आनंदाने उठून बसले.

इकडे महिष्मतीत सहस्त्रार्जुनाचे भेकड पुत्र पित्याच्या वधाचा सूड उगवण्याच्या संधीची वाट पहात होते. परशुराम कामासाठी आश्रमाच्या बाहेर गेलेत असे हेरांनी कळवताच सहस्त्रार्जुनाचे सगळे पुत्र जमदग्नींच्या आश्रमात आले. जमदग्नी अग्निगृहात ध्यानस्थ बसलेले होते. त्यांना मारण्यासाठी आलेल्या सहस्त्रार्जुनाच्या पुत्रांना पाहून रेणुकेने खूप दीनवाणी प्रार्थना केली. पण त्या क्रूर पुत्रांनी तिच्या कडे पूर्ण दुर्लक्ष केले. ते जमदग्नींचे मस्तक कापून घेऊन गेले. रेणुका जीवाच्या आकांताने परशुरामांना हांका मारू लागली. मातेचा आक्रोश पराशुरामांपर्यंत पोहोचला. ते त्वरित आश्रमात आले. मातेचा हृदय पिळवटून टाकणारा शोक व पित्याचा दारूण अंत पाहून परशुरामांच्या अंत:कर्णास तीव्र वेदना झाल्या. त्याना क्षणकाल भोवळ आली. पितृवधाच्या तीव्र धक्यातून क्षणार्धात स्वत:ला सावरून परशुराम शस्त्रसज्ज होऊन

महिष्मतीकडे निघाले. परशुरामांनी सहस्त्रार्जुनाच्या सर्वच्या सर्व पुत्रांची मस्तके कापून काढली. रक्ताची नदी वाहू लागली. ती नदी ब्राम्हणांचा द्वेष करणाऱ्यांचे भयस्थान झाली. परशुरामांनी आपल्या पित्याचे शीर आश्रमात आणून पित्याच्या शरीराला लावून मग उत्तरकार्य केले. क्षत्रिय राजे अश्याप्रकारे पाप करू लागल्यामुळे परशुरामांनी एकवीस वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय केली. त्यानंतर परशुरामांनी अनेक यज्ञ केले. सर्वदेव स्वरूपी परमात्म्याचे पूजन केले. यज्ञात परशुरामांनी संपूर्ण पृथ्वीचे दान करून आपण सरस्वतीनदीच्या अवभृथ स्नानाने शुध्द व निष्पाप झाले. त्याच वेळी जमदग्नींना स्मृतिरूप शरीर प्राप्त झाले व त्यांना सप्तर्षींच्या समूहात सातवे स्थान मिळाले. त्यानंतर परशुरामांनी दंड त्याग केला. शांत चित्ताने महेंद्रपर्वतावर वास्तव्यास निघून गेले. नवीन मन्वंतर सुरु झाल्यावर वेद मार्गाचे ते प्रवर्तक होणार आहेत. याप्रमाणे भगवान श्रीहरीने अवतार धारण करून पृथ्वीला भारभूत झालेल्या बहुतेक राजांचा नि:पात केला. शुकमुनी पुढे म्हणाले, " राजन्! गाधीराजाला म्हणजेच सत्यवतीच्या पित्याला अग्निसारखा तेजस्वी पुत्र झाला. त्याने क्षात्रवृत्तीचा त्याग करून तपाचरणाने ब्राम्हतेजाची प्राप्ती करून घेतली. त्याचे नाव विश्वामित्र. विश्वामित्रांना शंभर पुत्र झाले. त्या सगळयांना मधुच्छन्द्स असे म्हणत. हरिश्चंद्राच्या रोहित नामक पुत्राने वरुणाची नरमेधाची मागणी पुरी करण्यासाठी विकत घेतलेला शुन:शेपा हा अत्यंत निष्काम, विरक्त व सात्विक हरिभक्त होता. (पूर्वसंदर्भ पुष्प ११६, स्कं.९, अ. ७ वा) त्याने यज्ञस्थानी प्रकट झालेल्या ब्रम्हदेवांची स्वत:च्या संरक्षणाची प्रार्थना केली. त्यामुळे शरणागताचे रक्षण करण्याच्या ब्रीदाला अनुसरून देवांनी त्याचा बळी जाऊ दिला नाही. व त्याला विश्वामित्रांना दान दिले.

विश्वामित्रांनी त्याचे श्रेष्ठत्व जाणून सर्वश्रेष्ठ व ज्येष्ठ पुत्र म्हणून स्वीकार केला. पण विश्वामित्रांच्या पहिल्या पन्नास पुत्रांना ही गोष्ट अजिबात आवडली नाही. तेंव्हा विश्वामित्रांना राग येऊन त्यांनी त्या पहिल्या पन्नास पुत्रांना रागाच्याभरात "म्लेंछ व्हा!" असा शाप दिला. त्यामुळे पहिले पन्नास पुत्र म्लेंछ झाले. मधल्या म्हणजे पन्नासाव्या पुत्राचे नाव मधुछंद होते. त्या मधुछंदाने व इतर एकुणपन्नास पुत्रांनी पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानली. त्यामुळे विश्वामित्र प्रसन्न झाले व त्या सर्व पुत्रांना, तुम्ही माझी आज्ञा मान्य केल्यामुळे तुम्हाला महापराक्रमी व वीर पुत्र होतील असा आशिर्वाद दिला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२४ वे (अध्याय १७ व १८)

## आयूचा वंश व ययाती

शुकमुनी पुढे सांगू लागले, "राजन्! पुरुरव्याचा ज्येष्ठ पुत्र आयु. आयुला नहुष, क्षत्रवृध्द, रजी इत्यादी सहा पुत्र होते. यातल्या क्षत्रवृध्दचा नातू गृत्समद व गृत्समदाचा नातू शौनक! हा शौनक ऋग्वेद जाणणाऱ्या सर्व ऋषींमध्ये श्रेष्ठ होता. आता नहुषाचा वंश ऐक. नहुषाला यती, ययाती, संयाती इत्यादी सहा पुत्र होते. नहुष स्वर्गाधिपती झाला. पण इंद्राणीचा अपमान केल्याने ब्राम्हणाच्या शापाने अजगर योनीत गेला.(पूर्व संदर्भ पुष्प ८७, भा. स्कं.६,अ.१३ ) यती विरक्त झाला. त्यामुळे नहुषाचे राज्य ययातीला मिळाले. ययातिच्या काळी दैत्यकुळातील वृषपर्वाही राजा होता. त्याचे गुरु शुक्राचार्य होते. शुक्राचार्यांची कन्या देवयानी. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा. शर्मिष्ठा अत्यंत गर्विष्ठ होती.

शर्मिष्ठा एकदा आपल्या सखींसह देवयानीला घेऊन नगरा बाहेरील उपवनात वनविहाराला गेली. उपवनातल्या एका रम्य सरोवरात त्या साऱ्या जणी विवस्त्र होऊन जलक्रीडा करू लागल्या. इतक्यात भगवान शिव-पार्वती सरोवरा जवळून जाताना त्यांनी पहिले. म्हणून घाईघाईने त्या सगळ्याजणी काठावर येऊन भराभर वस्त्रे नेसू लागल्या. त्या गडबडीत शर्मिष्ठा स्वत:चे समजून देवयानीचे वस्त्र नेसली. ते पाहून देवयानी संतापली व शर्मिष्ठेचा पाणउतारा करीत म्हणाली. " यज्ञातला हविर्भाग कुत्रीने घ्यावा तशी माझी वस्त्रे या दैत्यकन्या शार्मिष्ठेनी घेतली आहेत." राजकन्या शर्मिष्ठेला ते सहन झाले नाही. तिनेही देवयानीचा पाणउतारा केलाच. ती म्हणाली, " अग भिक्कारडे! आमच्याच द्रव्यावर उपजीवन चालवणारी कावळी तूं. आणि मिजास कसली दाखवतेस गं?" असे म्हणून चालता चालता देवयानीला ओढीत ओढीत एका विहिरीजवळ आणले. तिला विवस्त्र केले आणि विहिरीत ढकलून देऊन सखींसह निघून गेली. योगायोगाने ययाति त्या विहिरीजवळ आला. विहिरीत धडपडणाऱ्या देवयानीला त्याने वर काढले. आपल्या अंगावरील शेल्याने तिचे लज्जा रक्षण केले. तेंव्हा देवयानीच्या मनात ययाति बद्दल प्रेमभावना जागी झाली. तिने राजाला आपले पाणिग्रहण करण्याची विनंती केली. कचाने दिलेल्या शापाची सर्व हकीकत सांगून तिने ययातीच्या मनातील शंका दूर केली. प्रथम राजाच्या मनात तिची जराही अभिलाषा नव्हती. पण देवयानीच्या बोलण्यामुळे त्याच्या मनात तिची अभिलाषा उत्पन्न झाली. त्याने तिचे म्हणणे मान्य केले व

योग्य समयी तुझ्या पित्याला भेटेन असे सांगून ययाति निघून गेला. घरी येउन देवयानीने पित्याला सारी हकीकत सांगितली. शुक्राचार्यांना आपल्या पुरोहित वृत्तीचा राग आला व नेसत्या वस्त्रानिशी ते देवयानीला घेऊन वृषपर्व्याचा त्याग करून निघाले. वृषपर्व्याला हे समजताच त्याने धावत जाऊन शुक्राचार्यांची क्षमा मागितली. तेंव्हा शुक्राचार्यांनी देवयानीचे समाधान कर असे सांगितले. वृषपर्वा देवयानीची मनधरणी करू लागला. तेंव्हा देवयानीने अट घातली कीं, माझे वडील ज्या घरी मला देतील त्या घरी शर्मिष्ठेने आपल्या दासींसह माझी दासी झाले पाहिजे. वृषपर्व्याने शर्मिष्ठेच्या अनुमतीने पण नाईलाजाने ती अट मान्य केली. शुक्राचार्यांनी विधिपूर्वक ययातीला देवयानीचे कन्यादान केले. शर्मिष्ठा आपल्या सहस्त्र दासींसह देवयानी बरोबर गेली. तेंव्हा शुक्राचार्यांनी ययातीला बजावले कीं शर्मिष्ठेचा पत्नी म्हणून स्वीकार करू नकोस. कालांतराने देवयानीला संतती झाल्यावर शर्मिष्ठेला राहवले नाही. तिने यायातिशी समागम करून संतती प्राप्त करून घेतली. देवयानीला यदु व तुर्वसु असे दोन पुत्र झाले. तर शर्मिष्ठेला ययाति पासून द्रुह्यु, अनु व पुरु असे तीन पुत्र झाले. देवयानीला हे समजल्यावर ती ययातीचा त्याग करून पित्याकडे निघून गेली. तिला परत आणण्यासाठी ययाति जेंव्हा शुक्राचार्यांच्या विनवण्या करू लागला तेंव्हा आधीच संतापलेल्या शुक्राचार्यांनी ययातीला शाप दिला कीं तूं "जराग्रस्त होशील!" तेंव्हा ययाति चतुराईने म्हणाला आपण आपली कन्या मला दिलेली आहे तिचा तरी विचार करायचा होता. कारण तिचीही संसारतृप्ती अद्याप झालेली नाही! तेंव्हा उ:शाप द्या! ययातीचे हे बोलणे ऐकून शुक्राचार्यांचा पहिला रागाचा भर ओसरला व नीट विचार करून त्यांनी “जो कोणी तुझी जरा घेण्यास तयार होईल त्याचे तारुण्य तुला प्राप्त होईल.” असा उ:शाप दिला. ही सवलत मिळताच ययाति मोठ्या आशेने सर्वात थोरला मुलगा यदुकडे आला. पण यादुने स्पष्ट नकार दिला. तसाच तुर्वसू, द्रुह्यु, अनु यांनीही नकार दिला. सर्वात धाकटा पुरु वयाने जरी कनिष्ठ होता तरी गुणांनी फार श्रेष्ठ होता. ययातीने त्याला विचारता क्षणीच तो म्हणाला, " तात! आपल्याच कृपेने पुत्राला श्रेष्ठ पुरुषार्थाची प्राप्ती होते. पित्याच्या मनातले जाणून त्याप्रमाणे वागणारा तो श्रेष्ठ पुत्र, आज्ञापालन करणारा तो मध्यम, मनात नसताना ऐकणारा तो कनिष्ठ व न ऐकणारा तो मला समान असतो." असे म्हणून पुरूने ययातीच्या जरेचा स्वीकार केला. मग ययातीने यथाशास्त्र विषयोपभोग घेतला. देवयानीही त्याला अनुकूल होती. पण ययातीचे समाधान होईना! म्हणून त्याने यज्ञ आरंभले, हरीचिंतन सुरु केले. हे सर्व मनापासून करीत असूनही त्याचे देवयानीवर असलेले विषयासक्त चित्त जराही निवृत्त होण्यास तयार झाले नाही.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२५ वे (अध्याय १९ व २०)

## ययातीचा गृहत्याग व पुरुवंश

विषय सुखाचे नश्वरत्व राजा ययातिच्या लक्षात येताच त्याने त्या गोष्टीवर खूप विचार केला. आत्मानात्म विवेक करण्याचा त्याचा निश्चय पक्का झाल्यावर तो देवयानीला म्हणाला, " देवयानी! अनंत काल तुझ्या बरोबर रमूनही तृप्ती न होणाऱ्या बोकडासारखी माझी अवस्था झाली आहे. तुझ्या आकर्षक व्यक्तिमत्वाने व तुझ्या अत्यंत मधुर, समयोचित प्रेमालाप इत्यादींनी मी अगदी तुझ्या अंकित झालो आहे. पण विचारांती माझ्या हे लक्षात आले आहे कीं विषयभोगाने विषयवासना कधीच तृप्त होऊ शकत नाही. उलट तुझ्या अनुकूल वर्तनामुळे ती वाढतच जात आहे. मला शरीर दुर्बलता आलेली नाही. तथापि ती आली तरी इच्छा रूपाने उत्पन्न होणारी वासना दुर्बल होत नाही हेच खरे. पण जो मनुष्य अहंकार, काम, क्रोध, लोभ, मोह, परिग्रह इत्यादींचा आत्मानात्म विवेकाने त्याग करतो त्यावेळी त्याला समाधान प्राप्त होते. यास्तव हे देवयानी! सर्व दु:खांचे मूळ असलेल्या भोगेच्छेचा मी त्याग करीत आहे. मी पुरुचे तारुण्य पुरुला परत करून राज्यत्याग करून ईश्वरप्राप्तीसाठी वनात जात आहे." देवयानीही त्याच वेळी अंतर्मुख झाली. ययातीने पुरुचे तारुण्य पुरूला परत केले. आपली जरा परत घेतली. पुरुला ययातीने सार्वभौमपदाचा अभिषेक केला. वडील भावांना त्याच्या अधिपत्याखाली राहावयास सांगितले. व ययाती सर्वसंग परित्याग करून स्वत:वनात निघून गेला. वनात गेल्यावर तपाचरणाने ययातीने आपले चित्त भगवान श्रीहरीच्या ठिकाणी एकाग्र केले. थोड्याच दिवसात अत्मानुभवाचा आनंद प्राप्त करून त्याने आपला देह श्रीचरणी अर्पण केला. मुक्त झाला. पतिव्रता देवायानिनेही तोच मार्ग अक्रमला व मुक्त झाली.

शुकमुनी पुढे म्हणाले, " हे राजन्! आता पुरुवंशाचे वृत्त ऐक! या पुरू वंशातच तुझा जन्म झालेला आहे. पुरु पासून सोळाव्या पिढीत दुष्यंत नामक राजा जन्माला आला. दुष्यंत एकदा शिकारीच्या निमित्ताने वनात फिरताना तहान लागली म्हणून कण्वमुनीच्या आश्रमात गेला. तिथे त्याचे स्वागत कण्वमुनीची मानसकन्या शकुंतलेने केले. दुष्यंताचे मन तिच्यावर आसक्त झाले. म्हणून त्याने आश्चर्याने विचारले कीं तूं नक्की कुणाची कन्या आहेस? कारण पुरुकुळात जन्मलेल्या माझ्या सारख्या धर्मनिष्ठ सम्राट राजाचे मन

आश्रमवासी ऋषीकन्येवर मोहित होणे शक्यच नाही. तूं निश्चितच राजकन्याच असली पाहिजेस! तेंव्हा शकुंतलेने आपला जन्म राजा विश्वामित्र व मेनका यांच्या संबंधातून झाल्याचा खुलासा केला. कण्वमुनी त्या दिवशी आश्रमात नसल्यामुळे शकुंतलेच्या संमतीने त्याच रात्री दुष्यंताने तिला पट्टराणी करण्याचे अभिवचन देऊन तिच्याशी गांधर्वपद्धतीने विवाह केला. त्याच रात्री दुष्यंताने आपल्या अमोघ वीर्याने शकुंतलेच्या ठिकाणी गर्भ स्थापना केली. दुसऱ्या दिवशी सकाळीच तो आपल्या राजधानीकडे निघून गेला. यथावकाश कण्वमुनी आश्रमात परतल्यावर शकुंतलेने सर्व घटना त्यांना कथन केली. राजा दुष्यंत शकुंतलेला आपल्या नगरीत नेण्याची व्यवस्था करणार होता. त्याची वाट पहात शकुंतला आश्रमातच राहिली. बराच कालावधी गेला. शकुंतला योग्यसमयी प्रसूत झाली. तिला पुत्ररत्न प्राप्त झाले. कण्व मुनींनी त्याचे नाव भरत ठेवले. बाल वयातच भरत आपला पराक्रम दाखवू लागला. दुष्यंताकडून शकुंतलेला नेण्याची काहीच लक्षणे दिसेनात. म्हणून कण्वमुनींनी आपल्या शिष्यांबरोबर तिला दुष्यंताकडे पाठवले. पण दुष्यंत तिचा स्वीकार करेना. त्यावेळी सर्व प्रजाजनांना एकू जाईल अशी आकाशवाणी झाली कीं, " हे दुष्यंता तूं शकुंतलेचा व तुझ्या पुत्राचा अव्हेर करू नको!" तेंव्हा सर्व प्रजाजनांना साक्षी ठेऊन दुष्यंताने त्या दोघांचा स्वीकार केला. पुढे भरत चक्रवर्ती राजा झाला. भरत राजा असताना प्रजेला जे हवे ते सर्व पृथ्वीपासून मुबलक मिळत असे. प्रजेच्या कल्याणासाठी त्याने अनेक यज्ञ केले. त्यावेळी केलेल्या दानधर्माने भरताची ख्याती सर्व जगातच नव्हे तर त्रिभुवनात झाली. पुढे अपत्य प्राप्ती साठी भरताने मरुत्स्तोम नामक यज्ञ केला. तेंव्हा यज्ञ देवतेने म्हणजेच मरुताने त्याना भरद्वाज नामक बृहस्पती व ममता यांनी उत्पन्न केलेला पुत्र दिला. पुढे योग्य समयी भरताने संपूर्ण वैभवाचा त्याग केला व राज्य भरद्वाजाच्या स्वाधीन करून स्वत: तपाचरणासाठी वनगमन केले. तप करून श्रीहरी चरणी लीन झाला.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

श्रीमद्भागवत- नववा स्कंध

पुष्प १२६ वे (अध्याय २१)

## भरतवंश व रंतिदेव, अजमीढ, द्रुपद

भरद्वाजा पासून चवथ्या पिढीतला रंतिदेव फार प्रसिध्द झाला. वित्ताचा व्यय हा होतच राहाणार हे स्वत:च्या मनावर रंतिदेवाने ठसवून घेतले व नित्य दानधर्म करू लागला. त्यामुळे तो निष्कांचन झाला. त्यामुळे एकदा त्याच्यावर व त्याच्या कुटुंबावर अठ्ठेचाळीस दिवस उपवास घडण्याचा प्रसंग आला. तरी त्याचा व त्याच्यामुळे त्याच्या कुटुंबाचा निश्चय काही ढळला नाही. प्रारब्धवशात त्याला अठ्ठेचाळीस दिवसांनी तूप, खीर,सांजा, व पाणी यांची प्राप्ती झाली. अठ्ठेचाळीस दिवसांच्या उपवासा नंतर तो कुटुंबासह भोजनास बसणार इतक्यात एक ब्राम्हण अतिथी म्हणून आला. त्यामुळे प्राप्त झालेल्या अन्नातला अर्धाभाग त्याला दिला. तो तृप्त होऊन निघून गेला. तेवढ्यात दुसरा एक शूद्र अतिथी आला. त्याला अर्ध्याभागातला अर्धा भाग देऊन संतुष्ट केले. आता उरलेले सेवन करावे अशा विचारात तो पाने घेऊ लागला इतक्यात आणखी एक अतिथी आला म्हणून उर्वरित अन्नाचे त्याला दान केले. आतां कुटुंबियांसह फक्त जलपान करावे या विचारात असताना अति दीन आवाजात एक चांडाळ बोलला, "तहानलेल्या मला जलपान हवे आहे. महाराज मला या तहनेच्या क्लेशातून मुक्त करा!" ह्या दीनवाण्या आवाजाने रंतिदेवाला फार वाईट वाटले. रंतिदेवांनी ईश्वराला स्मरून ते पाणीही त्या तहानलेल्या चांडाळाला देऊन त्याचे क्लेश दूर केले. त्याचे क्लेश दूर करीत असताना रंतिदेव मनात ईश्वराला म्हणत होते 'हे प्रभो! मी तुझ्याकडे मोक्षाची सुध्दा अपेक्षा करीत नाही पण या संसारातल्या प्राणीमात्रांची असंख्य दु:खे पाहून मी इतकेच मागतो कीं त्यांची ही सारी दु:खे तूं मला दे व त्या सर्वांना दु:ख मुक्त कर.' खरेतर रंतिदेव व त्याचे कुटुंब तहान व भूक यांनी अगदीच व्याकूळ झालेले होते पण रंतिदेवांनी व त्याच्या कुटुंबीयांनी शांती पूर्वक केलेला हा त्याग अपूर्वच होता. स्वत:च्या कुटुंबासह रंतिदेव परिपूर्ण नि:संग झालेला होता. बाह्यपदार्थांचा त्याग फार सोपा असतो पण स्वत:च्या कुटुंबावरची माया व स्वशरीरा विषयीची ही पराकोटीची विरक्ती अति कठीण असते. पण रंतिदेवाचे व त्याच्या कुटुंबियांचे हे अपूर्व भक्तियुक्त वैराग्य व नि:संगत्व पाहून साक्षात श्रीहरी ब्रम्हदेवांसह प्रगट झाले. रंतिदेवासह सर्व कुटुंबीय इतके निरपेक्ष झाले होते कीं त्यांनी श्रीहरी व ब्रम्हदेव यांना फक्त नमस्कार केला. त्यामुळे ते सर्व महान् योगी झाले.

भरद्वाजाचा नातू हस्ती. ह्या हस्तीनेच हस्तिनापुर नगरी वसवून ती आपल्या राज्याची राजधानी केली. हस्तीचा पुत्र अजमीढ. ह्या अजमीढाच्या सातव्या पिढीत भर्म्याश्व नामक राजा झाला व त्याला पांच पुत्र झाले ते पांचाल या नावाने ओळखले जाऊ लागले. त्यांना भर्म्याश्व्याने पांच प्रांतांचे अधिकारी नेमले. यातला थोरला मुद्गल. या मुद्गला पासून मौद्गल्य ब्राम्हण घराणे उदयास आले. मुद्ग्लास एक मुलगा व एक मुलगी असे जुळे झाले. त्यातला मुलगा दिवोदास. व मुलगी अहिल्या. अहिल्या गौतम ऋषींना दिली. गौतममुनींना अहिल्येपासून शरद्वत नामक पुत्र झाला. हा धनुर्वेदात निष्णात झाला. शरद्वतमुनींना उर्वशीमुळे एक जुळे झाले. ते वनातच जन्माला आले. पण उर्वशी त्याना तिथेच सोडून गेली. त्यावेळी शंतनू शिकारीसाठी आलेला होता त्याला ते जुळे दिसले. त्याच्या मनात त्या गोड जुळयाबद्दल कृपा उत्पन्न झाली. व शंतनुने त्यांचा सांभाळ करण्यासाठी त्यांना आपल्या बरोबर घेतले. त्या जुळयात एक मुलगी व एक मुलगा होता. शंतनुने आपल्या मनात या दोघांनी कृपा उत्पन्न केली म्हणून मुलीचे नाव कृपी व मुलाचे नाव कृप असे ठेवले. आपल्या अपत्यांना राजा शंतनू घेऊन गेल्याचे शरद्वतमुनींना समजल्यावर कन्यादान करण्यासाठी ते आपल्या मुलीला म्हणजे कृपीला स्वत:च्या आश्रमात घेऊन गेले. तिचा विवाह द्रोणाचार्यांशी लावून दिला. कृप शंतनूच्या आश्रयाने राहून  पुढे कृपाचार्य झाले. भर्म्याश्व्याचा नातू म्हणजेच मुद्गलाचा मुलगा दिवोदास. दिवोदासापासून अकराव्या पिढीत द्रुपद झाला. द्रुपदाची कन्या द्रौपदी. व पुत्र धृष्टद्युम्न.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत-नववा स्कंध

## पुष्प १२७ वे (अध्याय २२)

## कौरव व मगध वंश

अजमीढाचा पणतू कुरु! हा कुरुक्षेत्राचा राजा झाला. कुरुला चार पुत्र झाले. थोरला परीक्षित, दुसरा सुधनु, तिसरा जन्हु व चवथा निषधास्व. परीक्षितला संतान नव्हते. सुधनुपासून सहावा बृहद्रथ! हा चेदी-देशीचा राजा झाला. याचा पुत्र जरासंध. जरासंधाचा पुत्र सहदेव. कुरूचा तिसरा पुत्र जन्हु. जन्हुपासून बाराव्या पिढीत प्रतीप नामक प्रसिध्द राजा झाला. हा हस्तिनापूरचा राजा झाला. त्याला थोरला देवापी व धाकटा शंतनू असे दोन पुत्र झाले. प्रतीप नंतर देवापी राजा व्हायचा पण तो विरक्त होऊन जंगलात गेला. म्हणून शंतनू राजा झाला शंतनू हा पूर्व जन्मातला महाभिष राजा होता. हा ज्याच्या शरीराला स्पर्श करी त्याच्या शारीरिक व्याधी नाहीशा होत असत म्हणून लोक त्याला शंतनू म्हणू लागले. एकदा शंतनुच्या राज्यात बारा वर्षे होत आली तरी पाऊस पडेना. तेंव्हा जाणकार श्रेष्ठ लोकांना शंतनुने असे होण्याचे कारण विचारले. तेंव्हा त्यांनी हे राज्य देवापिचे आहे. त्याला आतां राज्य करण्याची इच्छा झाली असणार म्हणून तुझे राज्य सदोष झाले आहे. तेंव्हा तूं देवापी कडे जा व त्याला राज्य दे! म्हणजे पाऊस पडेल. पण शंतनूच्या मंत्र्यांना शंतनूच राजा हवा होता. म्हणून त्यांनी वेदज्ञ ब्राम्हणांना हाताशी धरून देवापिला वेदभ्रष्ट करण्यास सांगितले. त्याप्रमाणे शंतनू देवापी कडे जाण्यापूर्वी त्या ब्राम्हणांनी देवापिशी वाद घालून त्याला संभ्रम उत्पन्न होईल अशी वेदातलीच वक्तव्ये केली. व वाद करण्यास पुन्हा येऊ. असे सांगून निघून गेले. देवापीची समजूत घालून त्याला परत आणण्यासाठी शंतनू जेंव्हा वेदज्ञ ब्राम्हणांना बरोबर घेऊन गेला तेंव्हा देवापी वेदा विरुध्द बोलू लागला. त्यामुळे तो राज्य ग्रहणास अयोग्य ठरला. त्यामुळे शंतनू निर्दोष झाला व पाऊसही पडला. पुढे देवापी तपाचरणाने निर्दोष झाला व योगमार्गाचा अवलंब करून उच्चलोकातील कलापग्रामी गेला. तो आताच्या प्रलया नंतर येणाऱ्या कृतयुगाच्या सुरवातीस सोमवंशाचे पुनरुज्जीवन करील. शंतनू निर्दोष राजा झाल्यावर त्याचा गंगेशी विवाह झाला व गंगेपासून त्याला महापराक्रमी भीष्म नामक पुत्र झाला.

पुत्राला शंतनुच्या हवाली करून गंगा स्वर्लोकी निघून गेली. गंगा स्वर्लोकी गेल्यावर शंतनूने सत्यवती नामक धीवर कन्येशी विवाह केला. सत्यवतीला विवाहापूर्वीच पराशर मुनीच्या पासून श्रीहरीचा

अंश असलेला द्वैपायन-व्यास नामक पुत्र झाला. तोच माझा पिता आहे व मी त्याच्या कडूनच हे भागवत शिकलो आहे. असो.

पुढे शंतनुला सत्यवती पासून चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन पुत्र झाले. चित्रांगद गंधर्वांकडून युद्धात मारला गेला. विचित्रविर्याचा विवाह भीष्मांनी पळवून आणलेल्या काशिराजाच्या कन्या अंबा व अंबालिका यांच्याशी झाला. विचित्रवीर्य त्या दोघींच्या सौंदर्यावर आसक्त होऊन थोड्याच कालावधीत क्षयी होऊन राज्याला वारसा न देताच मरण पावला. त्यामुळे सत्यवतीने भीष्मांच्या सल्ल्याने आपला पुत्र व्यास यांना पाचारण करून त्यांच्याकडून आंबा व अंबालिका यांच्यापासून अनुक्रमे धृतराष्ट्र व पंडू असे दोन पुत्र उत्पन्न करून घेतले. तसेच विचित्रवीर्याच्या एका आवडत्या दासीपासून विदुर नामक एक पुत्र उत्पन्न करून घेतला. धृतराष्ट्र आंधळा होता. त्याला गांधारीपासून दुर्योधानदी शंभर पुत्र झाले तेच कौरव व एक दु:शीला नामक कन्या झाली. पंडूला कुंती व माद्री अशा दोन भार्या होत्या. पण पंडूला ऋषीशापामुळे स्त्रीगमन वर्ज्य करावे लागले. त्यामुळे कुंतीने पती संमतीने यम, वायू व इंद्र ह्या देवांच्या कडून युधिष्ठिर, भीम व अर्जुन अशी संतती उत्पन्न करून घेतली. माद्रीने अश्विनीकुमारांकडून नकुल व सहदेव यांची प्राप्ती करून घेतली. हे पांच महापराक्रमी पुरुष म्हणजेच पांच पांडव. यांच्या पासून द्रौपदीला प्रतीविन्ध्य, श्रुतसेन, श्रुतकीर्ती, शतानीक व श्रुतकर्मा असे पाच पुत्र झाले. ते तुझे पितर आहेत. अर्जुनाला सुभद्रे पासून अभिमन्यू नामक पुत्र झाला.तोच तुझा पिता आहे. तुझ्या पित्याने भारतीय युध्दात अनेक अतिरथी जिंकले होते. अभिमन्यू व उत्तरा यांच्या पासून तुझा जन्म झाला. कुरुकुलाचा नाश करण्यासाठी अश्वत्थाम्याने सोडलेल्या ब्रम्हास्त्रापासून भगवान श्रीकृष्णांनी आपल्या सामर्थ्याने तुझ्यासह सर्व कुरुकुलाचे रक्षण केले.

जनमेजय, श्रुतसेन, भीमसेन व उग्रसेन हे तुझे चार पुत्र आहेत. तुला तक्षक दंशाने मृत्यू आल्याचे समजल्यावर जनमेजय सर्प सत्र करील. पुढे जनमेजयापासून सहाव्या पिढीत नेमिचक्र राजा होईल. त्याच्या कारकिर्दीत यमुनेला पूर येऊन हस्तिनापुर वाहून जाईल. मग तो कौशाम्बी येथे आपली राजधानी स्थापन करील. नेमिचक्रा पासून पुढे बावीस पिढ्या होतील व तेविसाव्या पिढीतल्या क्षेमक राजा नंतर कुरुकुलाचा शेवट होईल. त्यानंतर मगध वंशाचे राजे येतील. जरासंधाच्या सहदेवा पासून मगधवंशातला बाविसाव्या पिढीत शेवटचा राजा रिपुंजय होईल.

हरये नम:। हरये नम:। हरये नम:।

।।श्रीगुरु:शरणं।।

## श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२८ वे (अध्याय २३ पूर्ण व २४ चालू)

# अनु, द्रुह्यु, तुर्वसू, यदुवंश व विदर्भ वंश

ययातीच्या अनु नावाच्या दुसऱ्या पुत्रापासून अकराव्या पिढीत बली नामक राजा झाला. त्याला अंग,वंग, कलिंग,सुह्य, पुंड्र,व आंध्र असे सहा पुत्र झाले. त्यांनी आपल्या आपल्या नावाने आपली सहा राज्ये पूर्वेकडे स्थापन केली. अंगाच्या पंधराव्या पिढीत अधिरथ जन्माला आला. अधिरथाला अपत्य नव्हते. त्यालाच एकदा गंगा किनारी क्रीडा करताना एका पेटीत तेजस्वी पुत्र सापडला. अधिरथाने त्याचे नाव कर्ण ठेवले. कर्ण पुढे राजा झाला. ययातीच्या द्रुह्युचे पुत्र उत्तरेकडे राजे झाले. ययातीचा थोरला पुत्र यदु. या यदु वंशाचे वृत्त अत्यंत पुण्य कारक आहे. कारण या वंशात भगवान श्रीकृष्णांनी मनुष्य रूपाने अवतार धारण केला. यदुला सहस्त्रजित, क्रोष्टा, नल व रिपु असे चार पुत्र झाले. यातील सहस्त्रजिताच्या हैहय नावाच्या नातवाच्या वंशात दहाव्या पिढीत कार्तवीर्य अर्जुन नावाचा एक महा पराक्रमी राजा झाला. या कार्तवीर्य अर्जुनाने भगवान श्रीदत्तात्रेयांना प्रसन्न करून घेतले होते. भगवान श्रीदत्तगुरुंच्या कृपेने कार्तवीर्य अर्जुनाने स्वत:ला एक सहस्त्र हात मागून घेतले होते व अनेक सिद्धी प्राप्त करून घेतल्या होत्या. कार्तवीर्य अर्जुन अशा योग्यतेला प्राप्त झाला होता कीं त्याच्या नुसत्या स्मरणाने नष्ट झालेले द्रव्य पुन्हा प्राप्त होते. तो श्लोक असा, "कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहू सहस्त्रवान । तस्य स्मरण मात्रेण गतं नष्टंच लभ्यते ॥" पण पुढे त्याच्या उन्मत्त वर्तनामुळे परशुरामांशी झालेल्या युद्धात त्याच्यासह त्याचे अनेक पुत्र मारले गेले. अनेक पुत्रांपैकी पांच जण वांचले. त्या पांच पुत्रांपैकी मधुचा पुत्र वृष्णी. या वृष्णी कुळातच माधव, वृष्णी व यादव असे तीन प्रसिध्द पुरुष झाले त्या पुरुषांच्या नावाने हे कुल ओळखले जाऊ लागले. यदूचा दुसरा पुत्र क्रोष्टा. ह्या क्रोष्ट्याच्या वंशात चवथ्या पिढीत महाभोज नावाचा मोठा योगी राजा होऊन गेला. महाभोजा पासून पाचव्या पिढीत ज्यामध नावाचा प्रसिध्द राजा झाला.

त्याला शैब्या नावाची पत्नी होती. ज्यामधाने एकदा शत्रूवर स्वारी केली व युध्द करून परत येत असता त्याने शत्रूच्या भोज्या नामक राजकन्येचे हरण केले. पण आपल्या राज्यात परतल्यावर त्याच्या रथातल्या राजकन्येला पाहून शैब्या संतापून ज्यामधला म्हणाली, " रथातल्या माझ्या जागी ही कोण स्त्री

आणून बसवली आहे? " त्यावेळी क्रुध्द पत्नीची समजूत घालण्यासाठी ज्यामध पटकन म्हणाला, " तुझी सून आहे! " तेंव्हा शैब्या हसत म्हणाली "मला तर अद्याप पुत्रही झालेला नाही तर ही माझी सून कशी काय होईल?" त्यावर ज्यामध म्हणाला " तुला जो पुत्र होईल त्याच्यासाठी ही उपयोगी पडेल." पुढे कर्म धर्म संयोगाने ज्यामाधाचा संकल्प पुरा झाला. योग्य समयी शैब्येला एक तेजस्वी पुत्र झाला. त्याचे नाव 'विदर्भ'. विदर्भ फार मोठा व प्रसिध्द राजा झाला. त्याने पित्याने आणलेल्या राजकन्या भोज्येशीच विवाह केला. विदर्भाला भोज्येपासून तीन पुत्र झाले. कुश, क्रथ व रोमपाद. यातल्या रोमपादाच्या वंशात दमघोषादिक चैद्य राजे झाले. विदर्भाचा दुसरा पुत्र क्रथाच्या वंशात विसाव्या पिढीत सात्वत नावाचा राजा झाला. ते सात्वत घराणे यदुच्याच कुळातले. या सात्वताला भजमान, भजि, दिव्य, वृष्णी, देवावृध, अंधक आणि महाभोज अशी सात मुले झाली. सगळेच पुत्र प्रसिद्ध झाले. महाभोज फार धर्मशील राजा झाला. त्याच्यापासून भोज घराणे निर्माण झाले.

हरये नमः। हरये नमः। हरये नमः।

।।श्रीगुरु:शरणं।।

# श्रीमद्भागवत- नववा स्कंध

## पुष्प १२९ वे (अध्याय २४ पूर्ण)

### विदर्भ वंश (पुढे चालू)

सात्वताच्या वृष्णी नामक पुत्रा पासून सहाव्या पिढीत आणखी एक वृष्णी जन्माला आला. त्याचे पुत्र श्वफल्क व चित्ररथ. श्वफ़ल्काचा पुत्र 'अक्रूर' व चित्ररथाचा पुत्र 'शूर'. ह्याच शूराचा नातू भगवान श्रीकृष्ण. ह्या शूरसेनाला वसुदेव, देवभाग, देवश्रवस, आनक इत्यादी दहा पुत्र होते व पांच कन्या होत्या. वसुदेवांचा जन्म होताच देवांनी आकाशात आनक नावाचे वाद्य वाजवून वसुदेवांचे स्वागत केले म्हणून त्यांना आनकदुंदुभी असे नाव प्राप्त झाले. पृथा, श्रुतदेवा, श्रुतकीर्ती, श्रुतश्रवा व राजाधिदेवी अशा पांच बहिणी वसुदेवांना होत्या. त्यातल्या पृथाला शूरसेनाने आपला मित्र कुंतीराजा याला दत्तक दिल्यामुळे ती कुंतीराजाची कन्या म्हणून कुंती या नावाने ओळखली जाऊ लागली. कुंतीराजाकडे अतिथी म्हणून आलेल्या दुर्वास मुनींची अथक व उत्कृष्ट सेवा लहान वयात या कुंतीने केली. त्यामुळे प्रसन्न झालेल्या दुर्वासांनी कुंतीला देवहुती नामक विद्या प्रदान केली. त्या विद्येने इच्छित समयी पांच वेळा विविध देवांकडून संतती प्राप्त करून घेता येईल असे दुर्वासमुनींनी तिला सांगितले. तथापि त्या मंत्राच्या परिणामांची जाणीव असण्या इतकी परिपक्वता त्या वेळी नुकत्याच वयात आलेल्या कुंतीला आलेली नव्हती. तिला प्राप्त झालेल्या वराची प्रचीती पाहण्याची बालिश उत्सुकता तिच्या मनात जागी झाली. तिने भगवान श्रीसूर्यनारायणांना उद्देशून तो मंत्र जपला. तत्क्षणी श्रीसूर्यनारायण मानवाच्या रुपात तिच्या समोर प्रकट झाले. तेंव्हा घाबरून तिने त्यांची क्षमा मागितली व सर्व परिणामाच्या जाणीवेतून त्यांना नकार दिला. पण मंत्र सामर्थ्याला बाधा आणता येत नसल्यामुळे सूर्यनारायणांनी कौमार्यभंग न होता व कोणास काहीही ज्ञात न होता तुला पुत्र होईल असे सांगून तिच्या उदरात आपले वीर्य स्थापन केले व स्वलोकी निघून गेले. पुढे योग्य समयी कुंतीला सूर्या सारखाच एक तेजस्वी पुत्र झाला. पण कौमार्यावस्थेत पुत्र झाल्याची लाज वाटून कुंतीने तो एका पेटीत घालून गंगेत सोडून दिला. पुढे कुंतीचा विवाह हस्तिनापूरच्या सम्राट पंडूराजाशी झाला. कुंतीच्या श्रुतदेवा नामक बहिणीचा विवाह करुषपुत्र वृध्दशर्म्याशी झाला. श्रुतदेवापासून वृध्दशर्म्याला दंतवक्र नामक पुत्र झाला. हा दंतवक्र म्हणजेच सनकादिक मुनींच्या शापाने मनुष्य जन्मास आलेला भगवान श्रीहरीचा जय नावाचा द्वारपाल होय. कुंतीच्या श्रुतश्रवा बहिणीचा विवाह चेदिराज

दमघोष याच्याशी झाला. दमघोषाचा श्रुतश्रवा पासून झालेला पुत्र शिशुपाल. वसुदेवाला देवकी,पौरवी, रोहिणी, भद्रा, मदिरा, रोचना, इला इत्यादी स्त्रिया होत्या. त्यात देवकी मुख्य होती. त्यातील रोहिणीला बलराम, कृत, गद इत्यादी पुत्र झाले. पौरवीला भूत, सुभद्र, भद्रवाह इत्यादी बारा पुत्र झाले. मदिरेला नंद, उपनंद, कृतक इत्यादी पुत्र झाले. भद्रेला केशी नामक गुणी पुत्र झाला. वसुदेवांची मुख्य पत्नी देवकी. देवकीला आठ पुत्र झाले. कीर्तिमान, सुषेण, भद्रसेन, ऋजू, संमर्दन, भद्र व शेषाचा अवतार असलेला संकर्षण हे सात पुत्र व आठवा पुत्र म्हणजे साक्षात भगवान श्रीहरी. राजन्! तुशी आजी सुभद्रा ही सुध्दा वसुदेव-देवकी यांचीच कन्या होती. हे राजा परीक्षित जेंव्हा जेंव्हा पृथ्वीवर पाप वृद्धी होते व धर्मक्षय होतो तेंव्हा तेंव्हा भगवान श्रीहरी स्वच्छेने जन्म घेतात. श्रीहरिला जन्म व कर्म जरी संभवत नसले तरी भक्तांसाठी ते प्रकट होतात. या जन्म मृत्यूच्या रहाटगाडग्यातून सुटण्याचा एकाच मार्ग आहे तो म्हणजे श्रीहरीची कृपा. अंधकाच्या वंशात अंधकापासून सहाव्या पिढीत आणखी एक अंधक झाला व त्याच्या पासून पाचव्या पिढीत देवक व उग्रसेन जन्माला आले. देवकाला सात कन्या होत्या त्यात सगळयात धाकटी देवकी. उग्रसेनाला कंस, सुनाभ, न्यग्रोध इत्यादी पुत्र व कंसा, कंसवती, कंका इत्यादी पांच कन्या होत्या. त्या वसुदेवांच्या धाकट्या भावाला दिल्या. कलियुगातल्या भक्तांसाठी भगवान श्रीहरीने अत्यंत पुण्यकारक असे स्वत:चे चरित्र घडवले आहे. त्याच्या त्या यशस्वी चरित्राच्या श्रवणाने भक्तांचे दु:ख, उद्वेग, चिंता आणि मुख्य म्हणजे अज्ञान नाहीसे होते. अमृत मधुर असे हे श्रीहरीचे चरित्र सर्वश्रेष्ठ आहे. कारण त्याच्या श्रवणाने कर्मवासना धुतल्या जातात. भगवान श्रीकृष्णांचे व्यक्तिमत्व अत्यंत मोहक होते. त्यांच्या चेहऱ्यावर नित्य मधुर हास्य, मधुर वाणी, औदार्य, रुचकर भाषण, नानाविध क्रीडा, अतर्क्य पराक्रम ह्यांच्या योगाने भगवंताने मनुष्याला खूपच आनंद तेंव्हा दिला आहे व आजही देत आहेत. त्याकाळात त्यांच्या दर्शनाने स्त्री असो कीं पुरुष असो त्याची तृप्ती होत नसे. जन्मत:च गोकुळात जाणे, बालपणीच अनेक बलाढ्य शत्रूंना मारणे, अनेक स्त्रियांशी एकाचवेळी तितकी रूपे धारण करून विवाह करणे, अध्यात्म शास्त्राचा प्रचार करणे असे सर्व अतर्क्य वर्तन केले आहे. युध्दाच्या निमित्ताने कौरवांचा नाश करणे. अर्जुनाला विजयी करणे. शेवटी उध्दवाला ज्ञानोपदेशाने परिपूर्ण करून स्वत: निजधामास जाणे. हे सर्व अतर्क्य असेच आहे. जितके अतर्क्य आहे तितकेच ते श्रवणीय आहे, स्मरणीय व माननीय आहे .

हरये नम:। हरये नम:। हरये नम:|

इथे श्रीमद्भागवतातला नववा स्कंध पूर्ण झाला. या स्कंधात एकूण २४ अध्याय व ८९७ श्लोक आहेत. त्या सर्वांचा पुष्प १११ ते पुष्प १२९ हा साररूप अनुवाद आहे

स्कंध दहापासून पुढील खंडांसाठी

लिहा : esahity@gmail.com

किंवा भेट द्या : www.esahity.com

# ई साहित्य प्रतिष्ठान

वाचन हा एक चांगला टाईमपास आहे. त्यात चांगला वेळ जातो. पण वाचन हा केवळ टाईमपास नाही. आणि “वेळ” हा “घालवण्या”साठी नाही. आपण वाचत असतो तेव्हा आपण घडतही असतो. पुस्तकांतले शब्द आपले छिन्नी हतोड्याचे काम चोख बजावत असतात. मनावर संस्कार होत असतात. त्यामुळे वाचन करणारा समाज आणि निव्वळ पोटार्थी समाज यांच्यात फ़रक असतो. दिसतो. जाणवतो.

त्यातूनही शब्द जर मातृभाषेतून असतील तर त्या छिन्नीला धार येते. हातोडी जोमदार होते. आणि मातृभाषा जर मराठीसारखी भरजरी, वैभवशाली आणि धारदार असेल तर मनावर होणारा परिणाम आणि संस्कार अधिकच गडद असतात. म्हणून मराठीत वाचन संस्कृती रुजवायची आहे. वाचनाची आवड जोपासायची आहे. वाचनाची वृत्ती, वाचनाचा छंद फ़ुलवायचा आहे. एकट्यादुकट्या व्यक्तीत नाही. मराठीच्या कोट्यवधी साक्षरांत मराठी वाचनाची गोडी निर्माण करणं आणि त्याचं छंदात रुपांतर करणं हे आमचं ध्येय आहे. आणि त्यासाठी माध्यम आहे इंटरनेट.

एक गोष्ट सत्य आहे. अगदी रुस्तमातला रुस्तम वाचक आपलं पहिलं पुस्तक विनामूल्य मिळवतो. कधी घरात पडलेलं. कधी शेजारून. कधी वाचनालयातून. मग जसजशी गोडी लागत जाईल तसतसं किंमतीची पर्वा न करता पुस्तक मिळवून वाचायला लागतो. पण ही गोडी पेरावी, रुजवावी, जोपासावी लागते. म्हणून आम्ही विनामूल्य पुस्तकं दर आठवड्याला निर्माण करून पाठवत असतो. या अभियानात आम्हाला लेखकांचं खुप पाठबळ आहे. अनेक चांगले चांगले लेखक आपली उत्तम दर्जाची पुस्तकं आम्हाला विनामूल्य उपलब्ध करून देतात. म्हणून तर आम्ही आपल्याला उत्कृष्ट पुस्तकं विनामूल्य देऊ शकतो. विनामूल्य आहे म्हणून काहिही साधंसुधं देत नाही. बाजारात पैसे देऊनही मिळणार नाहीत अशी भारी पुस्तकं आम्ही विनामूल्य देऊ शकतो ती केवळ आमच्या लेखकांच्या कृपेने.

ई साहित्य प्रतिष्ठान हे व्यासपीठ नवीन साहित्यिकांसाठी आणि वाचकांसाठी ई पुस्तकांचे दालन घेऊन उभे ठाकले आहे. लाखो वाचकांपर्यंत ही पुस्तके विनामूल्य वितरीत करायला सुरूवात केली आहे. चार वर्षांपुर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना सुमारे चारशे, दर्जेदार, मराठी ई पुस्तके विनामूल्य दिली आहेत. चारशे नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. कविता, कथा कादंबऱ्या आणि गंभीर विषयांवरची पुस्तके प्रकाशित केली. दोन लाख रसिकांपर्यंत हे दर्जेदार साहित्य विनामूल्य पोचवले. चारशे गुणिले दोन लाख म्हणजे आठ कोटी पुस्तके ई साहित्य प्रतिष्ठान तर्फ़े वितरित झाली असे म्हणता येईल. तसे पाहिले तर हे एक भव्य काम सुरू आहे. नव्या प्रतिभा, नवे लेखक, नवीन निर्मिती. मराठीत एक नवा अध्याय लिहिला जात आहे.

आता आम्हाला वाचकांचं पाठबळ हवंय. ज्यांना पुस्तकं वाचायला आवडतात त्यांचे ई मेल पत्ते पाठवाच. पण जे साक्षर असून, मराठी असून काहीच वाचत नाहीत, किंवा 'मराठी' वाचत नाहीत अशांचे मेल पत्ते आवर्जून पाठवा. अशा दहा लोकांपैकी एकाला जरी मराठी वाचनाची आवड लावण्यात आपण यशस्वी झालो तरी ते एक पुढचे पाऊल असणार आहे. म्हणून ही कळकळीची विनंती आहे की आपल्या आजूबाजूच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या. या पत्त्यांचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी पुस्तके पाठवण्यासाठी केला जाईल. त्याचबरोबर दहा किंवा अधिक पत्ते पाठवणाऱ्यांना ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद म्हणून नोंदले जाईल. ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान

